॥ श्रीनटेश्वर प्रसन्न ॥

# महाराणा प्रतापसिंह,

## सप्तांकी संगीत नाटक.

( आवृत्ति दुसरी. )

---


**अनंत वामन बरवे,**

" संगीत शुकचरित, लोकमतविजय, उत्तररामचरित, समजुतीचा घोटाळा, ध्रुवचरित, मातृशिक्षाप्रभाव, गोपीचंद, प्रियदर्शिका,"

इ० नाटकांचे कर्ते, यांणीं हें तयार केलें.



तें

**बाळकृष्ण लक्ष्मण पाठक**

बुकसेलर ॲण्ड पब्लिशर, मुंबई, यांणीं

प्रसिद्ध केलें.


---



---


मुंबईंत " विजय " छापखान्यांत छापिलें.

सन १९०३.

किंमत आठ आणे.

# नाटकांतील कित्येक पद्यांच्या चाली

—०-०:x:०-०—

( अंक पहिला )—१ " पंचतुंड० "—२ " अष्टमूर्तिपर० "—३ " नृपाल कोप० "—४ " परिणिलें न० "—५ " बघुनि उपव०"—६ " शिरीं गंगा धरी चंद्रा० " —७ " शिवलिं बरें झालें० "—८ " कंठचर० " — ९ " तों तनन वा० " ( अंक दुसरा )—१ "राजाहुंमै कोम० "—२ " वीरा भ्रमरा० "—३ महीवरी चित्रां० " ४ "गौळिया पूजनचली०"—५ " आसो मासो० शरद—६ " खासे महाल वि० " —७ " अरे मुवे छोड० "—८ " जाऊं कामाला चला० "—९ "आवो आवो रं०" ( अंक तिसरा)—१ " सा सा ग " बँड.—२ " अएसरवर बरतर "—३ " प्रतिकूल होइ०" ४ " लग्नाला जा० "—५ " चल जाऊं झडक० "—६ "दूर दूर हं नारि०"—७ "योग्य न वणिज०"—८ "भला हुवा मै०"—९चल जाऊं झ० " (अंक चवथा )—१ " पाटलिना नृप नथि तुज० "—२ " थाकूंगे महराजकं० "—३ " अंजनपर्वा० "—४ " अंगिकार करु० "—५ " पंचतुंड० "—६ " सकुमार असु० "—७ "मज-भीति नसे मर० "—८ " राजा हूं मै कोम "—९ "पाहिन सिंहा०"—१० " लाल शाल० " ( अंक पांचवा. )—१ "सुर पुरिचें कार्य०" —२ " नको नको स्त्री सं०"—३ "सर्वांगाची हो०"—" ४शिवलीं बरें०"—५"मज भीति नसे० "—६ " किने देखा जियारो मेरा० —७ "एऽऽऽरंगि रंगे तूं रंगस"—८"पहा पहा काय०"—९ "दिलदार केनिरे० "—१० " जबके कलं० "—११ " नृमांशखंड० " ( अंक सहावा )—१ " लाल शाल० "—२ " अष्टमूर्ति० "—३ " पाहिन सिं० " ( अंक सातवा )—१ " भीरु मनां या० "—२ " फुलें वेलीचीं० "—३ रुससि फुगसि० "—४ " मार दियोरे पां भा०—५ " काय मला भू० "—६ " वाड वाडिलां "०—७ " क्या सुहं रंगोजि मो० "—८ " पाटलिना नृप० "

---

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.



इ. स. १८९५ सालीं हें नाटक प्रथमतः रचण्यांत आलें. त्यावेळीं उत्तमप्रकारें चालू असलेली जी " चित्तचक्षु चमत्कारिक कोल्हापुरकर नाटक मंडळी " तिचे चालक कै. **नरहर बुवा सरडे** यांच्या सूचनेवरून हें नाटक तयार करण्यास घेतलें, व तयार झाल्यावर उत्तम प्रकारें त्याला प्रयोग रूपांत सजवून लोकसमाजापुढें आणण्याचें आद्य श्रेय त्यांनींच मिळवलें. कै. नरहरबुवा नंतर त्यांच्यांतील कांहीं प्रमुख पात्रांनीं इतर कांहीं नाट्यकुशल पात्रांच्या साह्यानें जी " श्री माणिकप्रभु प्रासादिक संगीत नाटक मंडळी " सुमारें ७।८ वर्षांपासून आतां पर्यंत चांगल्या नांवलौकिकानें चालविली आहे, तिने हें नाटक पूर्वींच्याच तऱ्हेनें पुनः हातीं घेऊन महाराष्ट्रांतल्या बहुतेक प्रमुख ठिकाणीं त्याचे प्रयोग चालविले आहेत. त्याच प्रमाणें "नासिककर संगीत नाटक मंडळीनें " व आमचे मित्र रा. रा. बाबाजी दौलतराव राणे यांच्या "राजापुरकर संगीत नाटक मंडळी " नेंहि वारंवार अनेक ठिकाणीं या खेळाचे प्रयोग करून या नाटकाचें स्मरण लोकांत जागृत ठेवलें आहे. या सर्व मंडळ्यांनीं या नाटका संबंधानें हें जें अगत्य दाखवलें त्याबद्दल आह्मी त्या त्या मंडळीच्या चालकांचे व मालकांचे अत्यंत आभारी आहों.

प्रतापसिंह नाटक हें ऐतिहासिक नाटक आहे. यांतील इतिहास जगप्रासिद्ध शूरधीर उदार ह्मणून गाजलेल्या रजपुतांचा आहे. त्यांच्या या लोकोत्तर गुणांचें चित्र या नाटकांत अति उत्तम वठवलें आहे. तेव्हां अशा नाटकाचे प्रयोग वारंवार लोकांच्या सुबोध मनोरंजनार्थ होऊन पूर्वजांचें स्मरण जागृत ठेवण्याचें श्रेय आमची इतरहि महाराष्ट्र नाटक मंडळी घेतील अशी आशा आहे.

हें नाटक मुख्यतः टॉडसाहेबांच्या 'राजस्थान' नामक प्रसिद्ध पुस्तकाच्या आधारानें लिहिलें आहे. टॉडसाहेबांचा राजस्थानच्या इतिहासाशीं स्वतः फारच परिचय होता, आणि या दृढ परिचयामुळेंच रजपूत लोकांविषयीं त्यांच्या मनांत अत्यंत प्रेमभाव वसत असे. तेव्हां प्रेमामुळें अभिमान उत्पन्न होऊन त्यांचा हा इतिहास कदाचित एकदेशीय असण्याचा संभव आहे हें जाणून, सर्वस्वीं त्यांच्याच लेखाचे आधारें हें नाटक तयार न करतां, प्रतापसिंहाचे वेळच्या मोंगल बादशाहांचे इतिहास महमदी इतिहासकारांनींच लिहिलेले जे आहेत त्यांचें हि अवलोकन इंग्रजी भाषांतरद्वारा आह्मी केलें, आणि दोहोंच्या परिशीलनानें रजपूतांच्या आचार विचार विहाराची व त्यावेळच्या एकंदर परिस्थितीची जी आह्मास ओळख झाली तिच्या अनुरोधानें यथामति हें नाटक तयार केलें

हें वीररसप्रधान आहे तथापि इतरहि मनोरंजक

अनेक प्रसंग मुख्य रसाची हानि न होऊं देतां यांत पुष्कळ ठेविले आहेत.

असल्या प्रकारच्या नाटकांनीं हिंदुमुसलमानांत दुजाभाव निष्कारण जागृत राखला जातो अशी कित्येकांची समजूत होत असते; पण या समजुतीस आधारभूत असें एखादेंहि वाक्य या सर्व नाटकांत कोणास आढळणार नाहीं असें आह्मी खातरीनें सांगूं शकतों. उलट उभयतांतल्या त्या काळच्या प्रमुख राजपुरुषांचे योग्यतेची बिलकुल हानि न करतां त्यांचा परस्परांच्या मोठेपणास शोभेलसा समेटच घालून ठेवलेला यांत स्पष्ट आढळेल.

या नाटकाची ही दुसरी आवृत्ति लोकांपुढें आणण्याचें श्रेय आमचे मित्र रा. रा. बाळकृष्ण लक्ष्मण पाठक यांस आहे. पूर्वीच्या आवृत्तींतले बरेच दोष या आवृत्तींत शुद्ध केले आहेत. वीररसास हानि करणारीं जीं कुठें कुठें पद्यें प्रतापसिंहाच्या आवेशभरित भाषणाला मधेंच अडथळा करीत असत तीं काढून त्यांचें गद्य केलें व प्रत्यक्ष प्रयोग पाहतांना जे दोष व रंगभूमीवरल्या गैरसोई आढळल्या त्यांचीहि व्यवस्था लावली. तथापि यांत आणखीहि दोष राहिलेच असतील त्यांची सुज्ञ वाचकांनीं क्षमा करून गुण असतील तेच घ्यावे अशी प्रार्थना आहे.

अनंत वामन बरवे.

# अंकानुक्रमानें नाटक पात्रें व देखावे.

**मंगलाचरण**—सूत्रधाराच्या वेषानें पांच पुरुष पात्रें आणि नटीच्या वेषानें पांच स्त्री पात्रें दोहों आंगास उभीं राहून पहिलें नांदीचें पद्य ह्मणावें. शंकराचे देवाल्याचा देखावा दाखवल्यास अति उत्तम. मंगलाचरण होतांच सूत्रधारानें पुढें येऊन नाटकास आरंभ करावा. मागें पडदा टाकून देखावा बंद व्हावा.—भूदेवी ( हिचा प्रवेश जमिनींतून वर निघालेली असा दाखविला जाईल तर उत्तम होय. )—प्रतापसिंह ( पहाडाच्या एका गुहेंत निजलेला )—मातादेवी ( व्याघ्रारूढ अशी अंतरिक्षांतून उतरतांना दिसावी. )

**अंक पहिला**—प्रतापसिंह, चित्रभाष, चंडदास, जासूद, दोन शिपाई, भिल्ल, अमरसिंह, दिवाणजी, मानसिंह, एक सरदार.

**अंक दुसरा**—चंपा, मोहना, चमेली, प्रतापसिंह, चंडदास, चित्रभाष, दिवाणजी, माधोसिंग, गौर घेऊन आलेल्या नागरिकस्त्रिया राणी, रत्नसिंह, अमरसिंह, पुरोहित.

**अंक तिसरा**—गाझीखान, शहाबाजखान; मोंगलीसैन्य; मानसिंग, जासूद, प्रतापसिंह, शहाजादा. ( या अंकांत शहाजाद्याचे हत्तीवर प्रतापसिंहानें घोडा घालून दोघांची झटपट चाललेली असा देखावा दाखवावा. ) चित्रभाष, चंडदास, शक्तिसिंह, मानसिंह.

**अंक चवथा.**—रामकुंवर, ( मुसलमानी पुरुष वेषानें ) चंपा, राणी, अमरसिंह, व्यासजी. दिवाणजी, जासुद. गाझीखान, ( छावणीचे पाठीमागें पहाडी किल्याचा देखावा दाखवून त्यांतून डोकीवर पाट्या घेऊन भिल्ल जातांना दाखवावे. ) गाझीखानाचे तीन सरदार, साजिंद्यांसह नाचणारीण, ठाकुर, शिपाई, रत्नसिंह, जासुद,

# एक उतारा.

" What nation on earth would have maintained the semblance of civilisation, the spirit or the customs of their forefathers, during so many centuries of over whelming, depression, but one of such singular character as the Rajpoot ? Rajasthan exhibits the sole example in the history of mankind, of a people withstanding every outrage barbarity can inflict or human nature sustain, from a foe, whose religion commands annihilation, and bent to the earth, yet rising buoyant from the pressure, and making calamity whetstone to courage. How did the Britons at once sink uuder the Romans and in vain strive to save their groves, their druids, or the altars of Bal from destruction ! To the Saxons they alike succumbed; they again, to the Danes; and this heterogeneous breed to the Normans. Empire was lost and gained by a single battle, and the laws and religion of the conquered merged in those of the conquerors. Contrast with those the Rajpoots; not an iota of their religion or customs have they lost though many a foot of land. ...........Mewar alone, the sacred bulwark of religion never compromised her honour for her safety, and still survives her anceint limits; and since the brave Samarsi gave up his life, the blood of her princes has flowed in copious streams for the maintenance of this honour, religion and independence. "

—*Annals of Mewar* by *Lieut.Col. Todd.*

# अंकानुक्रमानें नाटक पात्रें व देखावे.

**मंगलाचरण**—सूत्रधाराच्या वेषानें पांच पुरुष पात्रें आणि नटीच्या वेषानें पांच स्त्री पात्रें दोहों आंगास उभीं राहून पहिलें नांदीचें पद्य ह्मणावें. शंकराचे देवाल्याचा देखावा दाखवल्यास अति उत्तम. मंगलाचरण होतांच सूत्रधारानें पुढें येऊन नाटकास आरंभ करावा. मागें पडदा टाकून देखावा बंद व्हावा.—भूदेवी ( हिचा प्रवेश जमिनींतून वर निघालेली असा दाखविला जाईल तर उत्तम होय. )—प्रतापसिंह ( पहाडाच्या एका गुहेंत निजलेला )—मातादेवी ( व्याघ्रारूढ अशी अंतरिक्षांतून उतरतांना दिसावी. )

**अंक पहिला**—प्रतापसिंह, चित्रभाष, चंडदास, जासूद, दोन शिपाई, भिल्ल, अमरसिंह, दिवाणजी, मानसिंह, एक सरदार.

**अंक दुसरा**—चंपा, मोहना, चमेली, प्रतापसिंह, चंडदास, चित्रभाष, दिवाणजी, माधोसिंग, गौर घेऊन आलेल्या नागरिकास्त्रिया राणी, रत्नसिंह, अमरसिंह, पुरोहित.

**अंक तिसरा**—गाझीखान, शहाबाजखान; मोंगलीसैन्य; मानसिंग, जासूद, प्रतापसिंह, शहाजादा. ( या अंकांत शहाजाद्याचे हत्तीवर प्रतापसिंहानें घोडा घालून दोघांची झटपट चाललेली असा देखावा दाखवावा. ) चित्रभाष, चंडदास, शक्तिसिंह, मानसिंह.

**अंक चवथा.**—रामकुंवर, ( मुसलमानी पुरुष वेषानें ) चंपा, राणी, अमरसिंह, व्यासजी. दिवाणजी, जासुद. गाझीखान, ( छावणीचे पाठीमागें पहाडी किल्याचा देखावा दाखवून त्यांतून डोकीवर पाट्या घेऊन भिल्ल जातांना दाखवावे. ) गाझीखानाचे तीन सरदार, साजिंद्यांसह नाचणारीण, ठाकुर, शिपाई, रत्नसिंह, जासुद,

**अंक पांचवा**—शक्तिसिंह, सागरसिंह, ( समाधि,छत्र्या, स्मारकस्तं यांचा देखावा ) प्रतापसिंह, भिल्ल, भिल्लीण. ( झोंपडीचा देखाव हेर, चित्रभाष. दिवाणजी; राणी. कांहीं स्त्रिया, ( पहाडांत रान देवीचें देऊळ) कांहीं सरदार. (सर्व स्त्रीपुरुषांचा केसरी पोशाख

**अंक साहावा**—पृथ्वीराज राठोड, गाझिखान;काजी, मुल्ला, नास्तिव पाद्रीसाहेब ( युरोपियन ), भालदार, चोपदार, अकबर बा शाहा, हिंदू पंडित, अबुल फाजल.

**अंक सातवा**—रत्नसिंग, रामकुंवर; प्रतापसिंह, चित्रभाष, भा दार. शक्तिसिंह, भामाशा ( जैन गृहस्थ ), माधोसिंग, भि गाझीखान, दिवाणजी, राणी, कांहीं दासी. ( छत्र सिंहासनास दरबारचा देखावा. )

---

सन १८९६ सालचा मुंबई इलाख्याचा जो नेटिव पब्लिकेशन्सच वार्षिक रिपोर्ट त्यांत प्रस्तुत नाटकाविषयीं पुढील प्रशंसापर उल्ले आहे:—

" Among the historical plays two only are deserv ing of notice. One is *Udepurcha Maharana*, whicl celebrates the heroic endeavours of Pratapsinhji, king of Mewar, to save Rajasthan from the Moslem yoke The other is...........Both these works afford interest ing reading and are well fitted for the stage."

——Annual Report of Native Publications for the year 1896.—

---

लोकप्रिय राजमान्य राजेश्री

# बाळ गंगाधर टिळक

## केसरीकर्ते, यांस

त्यांची निःसीम धीरोदात्तता, स्वतंत्रशीलता,
स्वदेशप्रीति, स्वहितनिरपेक्ष लोकहित-
परायणता, शुद्ध राजनिष्ठा इत्यादि
लोकोत्तर सद्गुणांस अनुलक्षून
ही अल्पकृति पूर्वोक्त
गुणगौरवार्थ

**समर्पण केली असे.**

## उदेपूरचा

# महाराणा प्रतापसिंह.



( अजमीरच्या 'राज्यस्थानसमाचार' पत्रांत आलेल्या चित्रावरून. )

॥ श्री नटेश्वर प्रसन्न ॥

# महाराणा प्रतापसिंह.

## ( संगीत नाटक. )




### मंगलाचरण.

( १ पद ) आरंभीं श्री मंगलदायक भगवंताचें स्मरण करूं ॥ यच्चिंतन दे विमल अशा त्या स्वानंदें निज हृदय भरूं ॥ त्यानंतर निज पूज्य गुरुजनां प्रेमपुरःसर नमन करूं ॥ अंगीकृत हें कार्य यशप्रद व्हाया आशीर्वचन वरूं ॥ सुबोधपर नव तथ्य कथानक नाटकरूपें प्रकट करूं ॥ रंजनविधि परि विशेष हितकर होय असा हा मार्ग धरूं ॥

---

सूत्रधार-( प्रवेश करून )—

( २ पद ) नैसर्गिक जी असे मानवी स्वातंत्र्यप्रीति ॥ देवताच ती आत्मोन्नतिची सेव्य सदा ह्मणती ॥ नै० ॥ अहंभावयुत चित्तें तिजला भजतां ती पावे ॥ तिच्या कृपें मनुजांस सहज मग धैर्य शौर्य यावें ॥ स्वर्ग तुल्य हें भूतल होउनि नरहि अमर होती ॥ नै० ॥

—अथवा असेंही ह्मणतां येईल, कीं,—

( साकी ) स्वाभिमान हें तेजच शक्ति स्वातंत्र्याची प्रीती ॥ ज्यांच्या आंगीं सिद्ध दोन हीं तेच सुखी या जगतीं ॥ जीवन यांविण तें ॥ क्षुद्रचि पशुहुनि सर्वमतें ॥

—पण पुरे; तो अभिमान आणि ती स्वातंत्र्यप्रीति याच उभयतांचें अपत्य, अशा एका धीरवीर राजपुरुषांचें लोकोत्तर चरित्र अवलोकन करायला हा प्रेक्षकसमूह इथं जमला आहे. तेव्हां या प्रकारच्या विचारांत आधींच कालक्षेप कशाला? या सभ्यजनांस एवढी विनंति करूं म्हणने आलं—

( कामदा ) मूळ ही कथा ऐतिहासिकी ॥ हें तिला दिलें रूप नाटकी ॥ यामुळें कुठें विकृति जी घडे ॥ ठेवणें क्षमादृष्टि तिजकडे ॥

—( पडद्याकडे पाहून ) प्रिये, जरा बाहेर येऊन क्षणभर नृत्यगायनानें आरंभीं या प्रेक्षकांस एकाग्रचित्त कर बरं.

( आंतुन शब्द ) "हा रे दैवा! मला अशी अनाथ पाहूनही यांना हे खुशालीचेच रंग सुचताहेत ना!"

**सूत्रधार** ( आश्चर्यानें )—काय? मी जिवंत असतां माझी स्त्री अनाथ? छे, पण हे माझ्या स्त्रीचे उद्गार नाहींत. ( पाहून ) तर मग अत्यंत अमंगल वेष धारण करून या मंगलांत ही दुसरीच स्त्री कोण येत आहे बरं?

( दिंडी ) अशुभ रक्षा लाविली सर्व आंगीं ॥ केश सुटले मोकळे पृष्ठभागीं ॥ वस्त्र ल्याली अति मलिन तें हि जीर्ण ॥ किती कृश ही निस्तेज उदासीन ॥

( आश्चर्य चकित असा एकीकडे उभा रहातो. )

स्त्री-( वर्णन केल्याप्रमाणें प्रवेश करून आपल्याशीं )—

( ३ पद ) मज अनाथ भाग्यहीन बघुनि ही अशी ॥ सुख विलास चैन यांस सुचत हीं कशीं ॥ आर्य असुनि नीचतेस दिसति कां खुषी ॥ हाय हाय हाय हाय ॥ लाज वाटते न काय अवदशेविशीं ॥ मज० ॥

सूत्रधार—अरे ! हीतर माझीच प्रिया, संकेताप्रमाणें चितोरची भूदेवी होऊन त्याकाळची देशस्थिति दर्शवीत इकडे आली आहे. तरमग आपणहि जाऊन आतां ही स्थिति उदेपूरचा महाराणा प्रतापसिंह याच्या प्रत्यक्ष दृष्टीस पडेल अशी योजना करावी. ( जातो. )

स्त्री—काय ? माझी ही दुर्दशा कोणाला दिसतच नाहीं? तर मी तिचं वर्णन करत्यें, तें ऐकून तरी सावध व्हाल काय ? अहो——

( ४ लावणी ) किति होत्यें वैभवशाली ॥ परि अहा काय मज आली ॥ अवदशा ॥ स्वातंत्र्यपदाहुनि ढकली ॥ परवश मज करिती झाली ॥ अवदशा ॥ यांतून मुक्त या वेळीं ॥ करि असा न उरवी वाली ॥ अवदशा ॥ मज कसें । लाविलें पिसें । हिनें हें असें ॥ छळक ही झाली ॥ मम रूपें जणुं अवतरली ॥ अवदशा ॥

—छे:, अझूनही सर्वांच्या मनाची स्वस्थताच पाहून यांना ऐकूंही येत नाहीं असं वाटतं. तर मग भोंवताली सुटलेली ही भयंकर वावटळ जाणवण्या सारखी जागृति, निदान सजीवता तरी, यांच्यांत असेल काय ? हाय हाय ! काय घोर तुफान हें !—

( ५ लावणी ) दुष्ट यवन हे जवन पवनसम गर्जत संचारती ॥ विद्युत्पतनापरि त्यांचीं तीं दुष्कर्में घडतीं ॥ जिकडे तिकडे प्रसंग दुर्धर घन घोरच वर्षती ॥ उध्वस्तचि मी ।रधाराशतखंडित जणुं संप्रतीं ॥ तमोरूप ही पसरे तुमची उदासीन वृत्ति ॥ उत्कर्षाचीं सकल साधनें वाताहत होतीं ॥

—आणि असंच ज्यापक्षीं झालं आहे, त्यापक्षीं आतां हे क्षत्रिय कुलाभिमानी श्री मातादेवी,—स्वतांच्या जडत्वामुळं ज्यांना सुखदुःखाचं ज्ञानच नाहीं, अशी काष्ठपाषाण मृत्तिकारूप मी अचेतनच पडून राहिलेली काय वाईट !

( मूर्छित पडते. पहाडाचा देखावा, व त्यांतील एकागुहेंत प्रतापसिंह निजलेला दृष्टीस पडतो. )

**प्रतापसिंह**—( भूदेवी मूर्छित पडल्याचें स्वप्न पाहात आपल्याशीं )—

( बॅंडची चाल ) बघून दुर्दशा अहा स्वभूमिची अशी ॥ [illegible]वृत्ति शांत राहवी कशी ॥ क्रोधरूप ती प्रचंड अग्नि चेतवी ॥ शत्रुरक्तसिंचनक्रियाच शांतवी ॥ आहे हें बहुलांछन आम्हा रजपूतां ॥ नष्टभ्रष्ट अशी या प्रिय वस्तुस बघतां ॥ वाटे शस्त्र करीं हें व्यर्थचि कीं आतां ॥ [ फलजीविता ॥

—वत्स, आमच्या कुलाची अभिमानी श्री मातादेवी आणि आमचं उपास्य दैवत श्री एकलिंगजी, यांची शपथ घेऊन आजपासून मी एक निर्बंध करून ठेवतों तो सर्वांनीं ऐकावा—

( अनुष्टुप ) जोंवरी दुर्दशा भोगी चितोर नगरी अशी ॥ तों ह्या सुखविलासांची नसो स्मृतिहि मानसीं ॥ सोडून नगरग्राम गिरिकांतार सेवणें ॥ पर्णशाला उभारूनि तापसी वृत्ति ठेवणें ॥ आबालवृद्ध सर्वांना ही आज्ञा आज पासुनी ॥ उल्लंघितां निश्चयानें होईल प्राणघातिनी ॥

( पुन: गाढ झोंपीं जातो. पहाडाचा देखावा बंद. )

मातादेवी—( व्याघ्रारूढ अशी अंतरिक्षांतून खालीं उतरून )—धन्य, प्रतापसिंहा धन्य आहेस तूं—

( झंपा ) धन्य तूं भूपते, ॥ खड्गधाराव्रतें ॥ क्षात्रधर्मोचितें ॥ आपुल्या या ॥ विघ्नशतखंडित श्रम जरी होय तव ॥ मुक्त करिशील भू याच चरितें ॥ ( भूदेवीस उद्देशून ) सखे ऊठ तूं ऊठ हे नगरदेवी ॥ व्यर्थ कां म्हणविशी नष्ट-देवी ॥ सखे ऊठ ॥

भूदेवी ( मातादेवीच्या गळ्यास मिठी मारून )—

(६ गज्जल) सखेबाई करूं काई मला आशा कशाचीगे ॥ भरंवसा तो कुणाचा मी धरूं आतां मला सांगें ॥...

मातादेवी ( तिला कुरवाळून )—

...मूर्तिमान् तो क्षात्रधर्म प्रकट आतां असे झाला ॥ उद्धरोनी तुला देवी पुन्हा स्वातंत्र्य द्यायाला ॥

भूदेवी ( उत्सुकतेनें )—भगवती, ही सुवार्ता मला अधिक स्पष्ट सांग बरं !

मातादेवी—ऐक; अग तुर्कांच्या [illegible] आज उध्वस्त मनामध्यें पूर्ण जागृत ठेवून [illegible] लोकवस्ती ॥ तिथें नांदते त्यांच्याशीं कोणत्याही प्र[illegible] जिथें कर्षित क्षेत्र भूभाग होता ॥ तेथ आतां ॥ जिथें भव्य होते महा-

शुद्ध राहिलेला जो या मेवाडचा सूर्यवंश, त्या वंशांत प्रतापसिंह या नांवाचा महाराणा नुकताच सिंहासनारूढ झाला आहे. हे भूदेवी, त्यानें ही तुझी अवस्था पाहून प्रतिज्ञाच अशी केली आहे कीं, तुझं पूर्ववैभव आणि स्वातंत्र्य तुला पुनः मिळून दिल्यावांचून कोणत्याहि प्रकारचं विलाससुख भोगायचं नाहीं. केवळ तापसीव्रत धारण करायचं. आणि तें आपणच नव्हे, तर सखे, आपल्या प्रजाजनांकडूनही पाळविण्याचा त्याचा निश्चय झाला आहे.

भूदेवी (आनंदानें)—अहाहा! तर मग माझा आशावृक्ष जो अगदीं दग्ध झाला होता, त्याला या अमृत वार्तेनं पुनः अंकूर येऊं लागले! हे भगवती, अशा पुरुषावर तुझी कृपादृष्टि असावी.

मातादेवी—अग—

(साकी) अत्युन्नत गुण जिथें स्थान तें प्रियच असे [illegible] ॥ तत्कन्येच्या ठायिं ठेवित्ये स्वतेज तत्साक्षाला॥ जाऊं चल आतां ॥ शांतवि संक्षुब्ध स्वांता ॥

---

[ प्रवेश १ ला—स्थळ, कोमळमीरच्या जवळचें अरण्य—पात्रें, [illegible] प्रतापसिंह व चंडदास, चित्रभाष असे दोघे भाट शिकारीच्या

—वत्स, आमच्या [illegible] त्याला पडलेल्या त्या विलआमचं उपास्य दैवत श्री एकलिं[illegible] [illegible]तं कीं,— आजपासून मी एक निर्बंध करून ठेव[illegible]

(दिंडी) चित्ति चिंतन चालतें चितोराचें ॥ ह्मणुनि पडलें हें स्वप्न तुह्मा त्याचें॥ भूमि दुष्टें भ्रष्ट जी नष्ट केली॥ कष्टमूर्तिच दृष्टिला स्पष्ट झाली ॥

**चंडदास**—होय,हाच तर्क बरोबर दिसतो. पण राणाजींनीं तशा त्या स्वप्नांतही केलेली घोर प्रतिज्ञा, इतक्या कडक रीतीनं पाळण्याचा पुढें निश्चय केलेला पाहून, त्या सत्वशील हरिश्चंद्र राजाचीच आठवण होते.

**प्रतापसिंह**—अहो चंडदास, चित्रभाष, हें पहा—

(साकी) महदनुकरण असे स्तुत्यचि परि यथार्थ न घडे जरि तें ॥ तरि तें वेडाविलें होतसे जाणावें सत्कृति-तें ॥ येवो दोष न हा ॥ मत्कृतनिश्चय कठिण महा ॥

**चंडदास**—आपला निश्चय किती कठीण आहे याची वेगळी कांहीं साक्ष द्यायला नको. त्या निश्चयामुळं या मेवाडच्या प्रदेशाला हल्लीं आलेलं हें रुक्ष स्वरूपच पहावं ह्मणजे झालं.—

(श्लोक) जणूं काय उद्यान हें रम्य नामी ॥ अशी होति विख्यात मेवाड भूमी ॥ परी आज तें सर्व सौंदर्य गेलें ॥ तया घोर कांतारसादृश्य आलें ॥ जिथें उद्यमें लोक उत्साहपूर्ण ॥ उदासीनता भासवी तेथ जीर्ण ॥ सुसंपन्नतेला जिथें स्वस्थ थारा ॥ असा प्रांत हा आज उध्वस्त सारा ॥ जिथें होति पूर्वी बहू लोकवस्ती ॥ तिथें नांदते आज ही घोर शांती ॥ जिथें कर्षित क्षेत्र भूभाग होता ॥ महारण्य कीं वाढलें तेथ आतां ॥ जिथें भव्य होतें महा-

शुद्ध राहिलेला जो या मेवाडचा सूर्यवंश, त्या वंशांत प्रतापसिंह या नांवाचा महाराणा नुकताच सिंहासनारूढ झाला आहे. हे भूदेवी, त्यानं ही तुझी अवस्था पाहून प्रतिज्ञाच अशी केली आहे कीं, तुझं पूर्ववैभव आणि स्वातंत्र्य तुला पुनः मिळवून दिल्यावांचून कोणत्याहि प्रकारचं विलाससुख भोगायचं नाहीं. केवळ तापसीव्रत धारण करायचं. आणि तें आपणच नव्हे, तर सखे, आपल्या प्रजाजनांकडूनही पाळविण्याचा त्याचा निश्चय झाला आहे.

**भूदेवी** ( आनंदानें )—अहाहा ! तर मग माझा आशावृक्ष जो अगदीं दग्ध झाला होता, त्याला या अमृत वार्तेनं पुनः अंकुर येऊं लागले ! हे भगवती, अशा पुरुषावर तुझी कृपादृष्टि असावी.

**मातादेवी**—अग—

( साकी ) अत्युन्नत गुण जिथें स्थान तें प्रियच असे आह्माला॥ तत्कन्येच्या ठायिं ठेवित्यें स्वतेज तत्साह्याला॥ जाऊं चल आतां ॥ शांतवि संक्षुब्ध स्वांता ॥

---

[ प्रवेश १ ला—स्थळ, कोमळमीरच्या जवळचें अरण्य—पात्रें, [illegible] प्रतापसिंह व चंडदास, चित्रभाष असे दोघे भाट शिकारीच्या [illegible]

—बस्स, आमच्या कु[illegible] [illegible]ल्याला पडलेल्या त्या विल- आमचं उपास्य दैवत श्री एकलि[illegible] [illegible]तं कीं,— आजपासून मी एक निर्बंध करून ठेवतो

( दिंडी ) चित्तिं चिंतन चालतें चितोराचें ॥ म्हणुनि पडलें हें स्वप्न तुह्मा त्याचें॥ भूमि दुष्टें भ्रष्ट जी नष्ट केली॥ कष्टमूर्तिच दृष्टिला स्पष्ट झाली ॥

**चंडदास**—होय,हाच तर्क बरोबर दिसतो. पण राणाजीनीं तशा त्या स्वप्नांतही केलेली घोर प्रतिज्ञा, इतक्या कडक रीतीनं पाळण्याचा पुढं निश्चय केलेला पाहून, त्या सत्वशील हरिश्चंद्र राजाचीच आठवण होते.

**प्रतापसिंह**—अहो चंडदास, चित्रभाष, हें पहा—

( साकी ) महदनुकरण असे स्तुत्यचि परि यथार्थ न घडे जरि तें ॥ तरि तें वेडाविलें होतसे जाणावें सत्कृतितें ॥ येवो दोष न हा ॥ मत्कृतनिश्चय कठिण महा ॥

**चंडदास**—आपला निश्चय किती कठीण आहे याची वेगळी कांहीं साक्ष द्यायला नको. त्या निश्चयामुळं या मेवाडच्या प्रदेशाला हल्लीं आलेलं हें रुक्ष स्वरूपच पहावं ह्मणजे झालं.—

( श्लोक ) जणूं काय उद्यान हें रम्य नामी ॥ अशी होति विख्यात मेवाड भूमी ॥ परी आज तें सर्व सौंदर्य गेलें ॥ तया घोर कांतारसादृश्य आलें ॥ जिथें उद्यमें लोक उत्साहपूर्ण ॥ उदासीनता भासवी तेथ जीर्ण ॥ सुसंपन्नतेला जिथें स्वस्थ थारा ॥ असा प्रांत हा आज उध्वस्त सारा ॥ जिथें होति पूर्वीं बहू लोकवस्ती ॥ तिथें नांदते आज ही घोर शांती ॥ जिथें कर्षित क्षेत्र भूभाग होता ॥ महारण्य कीं वाढलें तेथ आतां ॥ जिथें भव्य होते महा-

मार्ग रम्य ॥ पहा कंटकाकीर्ण सारें अगम्य ॥ जनांचीं निवास स्थळें जेथ होतीं ॥ सुखें श्वापदें आज तेथें रहातीं ॥

**प्रतापसिंह**—तर मग तुर्कांनीं या भरतभूमीची कशी दुर्दशा केली आहे हें प्रत्यक्ष समजून घेण्याला आमच्या लोकांना हा प्रदेश एक लहानसा नमुनाच झाला आहे असं म्हटलं पाहिजे.

**चित्रभा०**—पण राणाजी, आपण आज मुहूर्ताची शिकार करावयाला निघालां असून एकाहि सावजावर शस्त्र उचलीत नाहीं हें कसं ?

**प्रताप०**–अहो; मला वाटतं कीं, या प्रदेशांत आतां हीं सावजंच सुखानं राहोत. ह्यांच्या स्वेच्छसंचारानं तरी आमच्या लोकांना स्वतंत्राचरणाची कांहीं कल्पना राहील. हल्लींच्या क्रमावरून पाहतां ह्या पुढें ती ह्या प्राण्यांपासूनच शिकण्याचे दिवस येतील असं दिसतं.

**चंडदास**–होय तें; पण त्या कल्पनेचं तितकं आतां लोकांना अगत्यच राहील कीं नाहीं याची मात्र शंका वाटते. कारण पहा—

(श्लोक) निष्ठाशौर्यपवित्रतादि विकुनी सारीं परां-
कारणें ॥ आनंदें परतंत्रतेतचि पहा स्वीकारिलें राहणें ॥
स्वातंत्र्यस्मृति देइ पूर्वजकृति प्रत्यक्ष व्हावी अशी ॥
त्यांच्या त्या तर देशघातक मना इच्छाच नाहीं कशी ॥

**प्रताप०**–खरं आहे. आज अकबराचं व त्याच्या सत्तेचं एवढं माहात्म्य वाढायला व आह्मा सूर्यचंद्रवंशी

आर्यांहूनही त्या शिखानष्टांची अधिक योग्यता मानली जायला, त्या अकबराच्या ताटाखालील मांजरं किंवा त्याचे हुकूमबंदे कुत्रे झालेल्या या राजस्थानांतील आमच्या रजपूत राजांची जी एकेक नीचवृत्ति कारणीभूत झाली आहे, ती आह्मांला पार रसातळाला नेऊन पोंचवील! अरेरे—

( सवाई ) भ्रष्टविलें स्वकुलाप्रति यांनीं घालविलें निज नांवचि यांनीं ॥ जे यवनां प्रतिकाळचि होते रक्षिति ते अजि राज्य तयाचें ॥ स्वामि स्वतां असतां हि महीचे देति परास तिला उपभोगूं ॥ ज्यां अभिमान कुलीनपणाचा अर्पिति ते स्वसुता यवनांना ॥

—मागं आमच्या घराण्यांतल्या एका पितृघातकी पुरुषानं या तुर्कांशीं आमचा शरीरसंबंध घडवून बाप्पारावळाच्या पवित्र वंशाला कलंक लावण्याचा प्रसंग आणला होता, परंतु, श्रीएकलिंगजीची कृपा, ऐन वाग्निश्चयाचे वेळींच अकस्मात विद्युत्पात होऊन त्या घातक्याचा शेवट झाला आणि तो प्रसंग टळला! मी ह्मणतों, आतांही असाच एखादा मोठा उत्पात होऊन आपल्या सर्वस्वाचे घातक बनलेल्या आमच्या या रजपूत राजांचाही कां एकदम निःपात होऊन जात नाहीं!

**चित्रभा०**—कदाचित् आपल्या कृतसंकल्परूपी होम कुंडामध्यें आतां लौकरच प्रज्वलित होणाऱ्या प्रतापाग्नींत त्यांच्या आहुती पडायाच्या असतील.

**चंडदास**—असंच कांहीं होईल खरं—

( चर्पटपंजरी ) होउनि यवना सहायकारी ॥ झाले जरि ते महाधिकारी ॥ दिल्लीपतिच्या त्या दरबारीं ॥ चमकत असले नक्षत्रांपरि ॥ प्रतापरवि हा तेजा चढतां ॥ सहज तयां येईल नष्टता ॥

**चित्र०**—पण मी ह्मणतों, ते जिवंत आहेत असं तरी कां ह्मगावं ? कारण—

( होरी ) जगणें तें कसलें ॥ अस्तित्वचि जरि जडसम असलें ॥ जग० ॥ स्वातंत्र्याचें सन्मानाचें ॥ शोभे जीवन तरिच नराचें ॥ परि दोहोंसहि मुकलें ॥ जीवन्मृत ते सत्यचि झाले ॥ जगणें तें० ॥

**प्रताप०**—काय करूं रे. राणासंग आणि मी यांच्या-मध्यें एका पिढीचं अंतर न पडतं, तर या पवित्र आर्यभूमी-ला तुर्कांच्या छायेचाही स्पर्श राहूं दिला नसता ! परंतु पूर्वी ज्याप्रमाणं ह्या राक्षसांचं अंतःकरण न ओळखून यांजवर आमचे अप्रासंगिक उपकार झाले आहेत, त्याचप्रमाणं अलीकडेही यांचे मतलब न जाणून यांच्याशीं जे अप्रयो-जक सख्यसंबंध जोडले जात आहेत व त्यामुळं आपल्या-हातानं आपला पाय लंगडा करून ठेवावा त्याप्रमाणं हा प्रकार होत आहे, त्याबद्दल राहून राहून अतिशय संताप येतो. धिःकार धिःकार असो !—अरे पण इतरांना असा दोष देऊन त्यांचा नाश चिंतण्यासारखं मी तरी अद्यापि तसं काय केलं आहे ?—

( पं. चा. ) आमुच्या प्रिय भूमिचें ऋण या शिरीं बहु राहिलें ॥ राक्षितां जिस पूर्वजीं निज लोहितें किति माखिलें ॥ शत्रुंनीं करितां तिला अशि आज ही स्वपदांकित ॥ पाहतों, मग कां नव्हे मम भारभूतचि जीवित ॥

—अहो मी तरी आपल्या जन्माचं सार्थक तेव्हांच समजेन कीं,—

( सवाई ) जे असती सकल स्वविघातक लाजवीन जरि त्या स्वजनांना ॥ जे कपटें करुं अंकित इच्छिति लोळवीन जरि त्या यवनांना ॥ जी परतंत्रपणें अति कष्टत सोडवीन जरि त्या प्रिय भूला ॥ क्षत्रिय मी ह्मणवीन खरा तरि शोभविता निज सूर्य कुलाला ॥

( एक जासूद येऊन मुजरा करितो. )

**चित्रभा०**—कोणरे तूं ?

**चंडदास**—वेषावरून कोणी यवनी दरबारांतला दिसतो गाहे.

**जासूद**—नाहीं; मी राजे मानसिंग यांचा जासूद आहें.

**प्रताप०**—तर काय, तुमच्या धन्यानं कुलाचा आणि देशाचा अभिमान टाकला, त्याबरोबर आपल्या रजपूत वेषाचाहि त्याग केला असं दिसतं.

**जासूद**—महाराज, दिल्लीसरकारच्या तर्फे मोहिमेवर असतांना ह्या बादशाही निशाण्या कुलफौजेस आंगाखांद्यावर वागवाव्या लागतात.

**प्रताप०**—तेंहि एक बरंच करतां ह्मणावयाचं, त्या योगानं दिल्लीपतीच्या वतीनं ज्या आपल्याच देशबंधू-

वर तुमची धाड जाऊन पडावयाची, त्यांना हे कुऱ्हाडीचे दांडेच गोताला काळ होऊन आले आहेत असं वाटून जें दुप्पट दुःख व्हायचं, तें तुह्माला अशा वेषांत न ओळखल्यामुळें तरी होणार नाहीं.

**चंडदास**—कां? मानसिंगांची स्वारी कोणत्या मोहिमेवर निघाली आहे?

**जासूद**—राजेसाहेब दक्षिणेंत सोलापूर प्रांत काबीज करण्या करितां गेले होते. तिकडील स्वारी फत्ते होऊन हल्लीं ते दिल्लीकडे या रस्त्यानं चालले आहेत. जातां जातां प्रतापसिंह महाराज इथं जवळच शिकारीस आले आहेत असं ऐकलं, तेव्हां त्यांची मुलाखत घ्यावी असा त्यांचा विचार होऊन आपल्याला पुढें वर्दी देण्याकरितां त्यांनीं मला पाठविलं आहे.

**प्रताप०**—चंडदास, अहो चित्रभाष, हे पाहिलेत ना राजे मानसिंग, दिल्लीपतीचे नातेवाईक होऊन त्यांच्या हिताकरितां काबूल पासून ब्रह्मदेशापर्यंत त्या मोंगली राजसत्तेचा विस्तार केवळ यांनीं स्वतांच्या शौर्यानं करून ठेवला आणि आतां पहा दक्षिणेंत सुद्धां त्यांचेच झेंडे मिरवीत हे गेले होते. धिःकार असो यांना! अहो!—

(७ पद) **हानी होईल सर्वस्वाची ॥ कृत्यें ऐशीं नीच जयांचीं ॥ पाहुं नये तोंडेंहि अशांचीं ॥ स्वागत काय करूं ॥ त्यांचें ॥ न घडे कालत्रयीं मला तें ॥ स्वागत० ॥**

चित्रभाष—पण ज्या पेक्षां त्यांनीं होऊन भेटीची इच्छा दर्श—

प्रताप०—नाहीं. हा प्रसंग खचित नीटपणें निभाव-णार नाहीं. अहो—

—दास होउनी जे यवनांचे ॥ भ्रष्टविती पावित्र्य कुलाचें ॥ सन्मुख ऐशा त्या नीचांचें ॥ शांत कसें बसवे॥ मजला ॥ अंतर्वृत्तिस कसें उलट कीं ॥ वर्तन तें व्हावें ॥ मजला ॥

चंडदास ( एकीकडे )—खरं तें. जातिवंत रजपुताचं शीलच असं आहे. ( चित्रभाषास ) पण काय हो, मान-सिंगास त्यांच्या खऱ्या कर्तव्याची आठवण करून देण्याला ही अनायासं आलेली संधी साधून अकबराच्या दरबारांतलं हें एक जड प्रस्थ कांहीं वळवतां आल्यास बरं, असं तुह्माला नाहीं का वाटत ?

चित्रभाष—बरोबर ह्मणतां आपण. ( राणाजींस ) तर मग आह्माला वाटतं, राणाजींनीं या भेटीची स्वतः कांहीं विशेष तसदी घेऊंच नये. शिकारींत आपले बरोबर सरंजाम बराच असतो. तेव्हां राजधानींतून दिवाणजी व युवराज यांना बोलावून आणून कांहीं पर्यायानं राजेसाहे-बांचं स्वागत करून त्यांना वाटेला लावण्याची आह्माला आज्ञा असावी.

प्रताप०—त्याला माझी अनुज्ञा आहे. ( जासूद मुजरा करून जातो. ) बाकी माझा निश्चय तुह्माला माहीत आहेच—

( चामर. ) द्वेष्य जेविं ते मला सदांच तुर्क वाटती ॥ साह्य त्यांस तेहि तेंविं शत्रुसेच भासती ॥ तन्मुखाव-लोकनेंहि वीट येतसे मनीं ॥ वाटतें पडावि गांठ मात्र त्या रणांगणीं ॥

( जातात. )

---

( प्रवेश २ रा.–स्थळ, तेंच.–पात्रें, एका भिल्लास धक्काबुक्की करीत दोन शिपाई प्रवेश करतात. )

१ शिपाई–ए !–

( गाणें. ) चल चल जलदी आहे गरदी पाउल उचलीं झपाझपा ॥–

२ शिपाई—

ऐकेना तरि पाठीवरतीं हाण कोरडे सपासपा ॥–

१ शिपाई—

–चाबुक बसतां डोळ्यांवाटे गळेल पाणी टपाटपा ॥–

२ शिपाई—

–ओढ पुढें चलें जलदी नातरि होय धन्याची मर्जि खपा ॥–

भिल्ल–( गयांवयां करून )–

–दम धरा जरा ॥ माफ मज करा ॥ दीन पामरा ॥ जाउं द्या घरा ॥–

शिपाई—

–चल चोरा ॥–

१ भिल्ल—

–माफ करा ॥

१ शिपाई—

–चल चल जलदी आहे गरदी पाउल उच० ॥

( दिवाणजी व युवराज अमरसिंह हे येतात. )

**दिवाणजी**—हां, काय दंगा आहे रे ?

**भिल्ल**—( अमरसिंहाचे पाय धरून ) छोट धनीसाब, मजवर दया करा.

**१ शिपाई**— महाराज, उदेपुराहून इकडे येतांना हा एक गुन्हेगार वाटेंत आढळला, त्याला पकडून आणलं आहे.

**भिल्ल**—सरकार, नुसतं पकडूनच नव्हं, तर चांगला फरमाशी मार घेत घेत आणलं आहे. ही पघा कीं कशी पाठ सडकली हाय ती. अयाई !

**२ शिपाई**—मेवाडचा प्रदेश ओसाड टाकून सर्व वस्ती डोंगरा डोंगरावर न्यायची हा महाराजांचा सर्व रयतेला झालेला हुकूम यानं ऐकला नाहीं.

**भिल्ल**—आइकला व्हता कीं सरकार.

**१ शिपाई**—ऐकला असशील, पण मानलास कुठं ? साऱ्या गांवची वस्ती उठून गेली असतां तूं तर त्यांच्या घरादारांचा मालक होऊन खुशाल चैनीनं तिथं राहिला होतास कीं नाहीं ?

**भिल्ल**—आमा गरीबासनी कशाची चैन सरकार. चार कच्चींबच्चीं हायती. दोन दिस बरी गुजरान व्हईल म्हून राह्यलों व्हतों. सरकार आतां न्हाई व्हानार पघा. आपुन या वखतीं दया करा, माझी बायका पोरं आपनाला खाचित खाचित दुवा घेतील.

**अमरसिंह**—दिवाणजी, याला बरीचशी शिक्षा झाली

आहे. मग एकवेळ नुसती ताकीद देऊनच सोडून दिल्यास नाहीं का चालणार ? अगदीं गरीब दिसतो आहे बिचारा !

**दिवाण०**—आपलीच इच्छा असेल तर एकवेळ आपल्यासाठीं ह्मणून तसं करतां येईल. अरे द्या याला सोडून.

**१ शिपाई**—( भिल्लास )—नशीबवान आहेस बेट्या. थोरल्या ह्माराजांपुढं जातास ह्मंजे तुझीं शंभर वरसंच भरलीं होतीं !

**भिल्ल**—सरकार, आपुन मला ह्यें जिवदान दिलंत याच उपकार मी कदीं कदीं बि यिसरणार नाहीं.

**दिवाण०**—ईश्वर ही तुझी बुद्धि अशीच राखो. बरं ही गडबड एथून बंद करा, चला. अथवा जातां कसचे. राजे मानसिंग आतां या ठिकाणीं यावयाचे आहेत, तेव्हां त्यांच्या सरबराईसाठीं तुह्माला इथं जवळपास असलं पाहिजे. हे पहा आलेच ते.

( राजे मानसिंग व त्यांचे सरदार शिपाई येतात. )

**मान०**—अरे वः, ही कोण युवराजांची स्वारी ? आमचं स्वागत करण्याकरितां इथं उभी आहे वाटतं !

**अमर०**—होय आह्मी आपला योग्य सत्कार ठेवूं.

**मान०**—असं काय ? आपल्याला आदरातिथ्याचे सर्व प्रकार माहीत आहेत तर !

**अमर०**—होय.

मान०—काय काय बरं ते—

अमर०—ऐकावं—

* ( श्लोक ) आणावें सदनास जाउनि पुढें अत्यादरें पाहुणे ॥ बोलावें मग या बसा कुशलही प्रेमें तया पूसणें ॥ अर्पावे उपचार तेंवि आपुल्या शक्तीप्रमाणें वरी ॥ आहे हें श्रुतिवाक्य कीं अतिथिला तूं मान देवापरी ॥

मानसिं०—( लावून बोलण्याच्या हेतूनें दिवाणास ) हें सर्व ठीक आहे. पण यांत एक राहिलं, व तें असं, कीं घरच्या यजमानांनीं पाहुणचाराचं काम असं आपल्या मुला चाकरांचे हातींच परस्पर भागवून राहूं नये.

दिवाण०—आपलं भोजन होईपर्यंतच काय ते आम्ही आपल्या सेवेंत हजर राहणार आहोंत. राणाजींच्या आज्ञेप्रमाणं ती पहा, तंबूमध्यें सर्व तयारी ठेवली आहे. आपण तिकडे चलावं.

मानसिं०—काय राणाजींची आणि आमची यावेळींही मुलाखत होणार नाहीं ?

दिवाण०—शिकारीच्या श्रमानं प्रकृति जरा अस्वस्थ

---

* या श्लोकाचे ऐवजीं वाटल्यास पुढील पद्य ह्मणावें:—

( चाल—राजाहूं मै कोमका )

( येतां घरिं पाहुणे तया सामोरें जावें ॥ क्षेमकुशल अति आदरें त्यास विचारावें ॥ करून नंतर या बसा ते बसतां बैसावें ॥ यथाशक्ति उपचार तयानां प्रेमें अर्पावे ॥ "अतिथिदेव" या श्रुतिवचनाला शिरसा मानावें ॥ आतिथ्याचे प्रकार ऐसे असती जाणावे ॥ )

ह्मणून ते विश्रांती घेत आहेत. भोजनोत्तर ते आपल्या भेटीला येतीलच.

**मान०**—छे:, घरचे यजमान पंक्तीला असल्यावांचून त्यांच्या इथं पाहुण्यानींच जेवून जाणं चांगलं नव्हे. त्यांची स्वारी स्वतः जर आमच्या पंक्तीस न येईल तर आमचंही भोजन आज या ठिकाणीं होणार नाहीं. अन्नदेवतेला आम्ही इथूनच वंदन करून चालते होऊं.

**दिवाण०**—( एकीकडे ) आतां मात्र पंचाईत आली. ( उघड ) आपण जरा थांबावं. आपला हा निरोप कळवून पाहतों. ( जातो. )

**मानसिं०**—( आपल्या सरदारांस एकीकडे ) राण्यानं हा जो बाहणा केला आहे यांतलं इंगीत समजलों; पण मी तें उघड करून घेतल्यावांचून रहायचा नाहीं. राणा मोठा पीळदार खरा. आजपर्यंत दरबारांत पृथ्वीराज राठोड याच्या मुखानं मी त्याची नुसती कीर्ति ऐकत होतों; पण या मेवाडांत पाऊल ठेवल्यापासून प्रत्येक गोष्टींत त्याच्या मानीपणाचं स्पष्ट प्रतिबिंब दिसत आहे.

( प्रतापसिंह, दोघे भाट व दिवाणजी येतात. )

**मान०**—राणाजी, आम्ही आपल्या इथं आपणाला बरो-बर घेतल्यावांचून भोजन करणं हें बरं दिसतं काय ?

**प्रता०**—बरं कीं वाईट; पण त्याला उपाय नाहीं.

**मान०**—प्रकृती नीट नाहीं हेंच ना ? आपण थोडाच उपहार करा.

**प्रताप०**—आतां सांगणंच आलं ह्मणून स्पष्ट सांगतों. मानसिंग, आपण जातीचे रजपूत असतां आपल्या कुळाची पवित्रता एकीकडे ठेवून त्या भ्रष्ट कर्मांच्या [illegible] आपण सर्व प्रकारचा व्यवहार चालविला आहे. याकरितां आपले बरोबर माझीच काय, पण आमच्या या [illegible]न-कन्यांचीही एक पंगत होणार नाहीं.

**मान०**—आपल्याकडून आमचा अशा प्रकारचा सत्कार होईल, ही कांहीं आमची कल्पना नव्हती.

**प्रता०**—आणि आह्मा शुद्ध राहिलेल्यांना तरी, आपण आपल्या पंक्तीला ओढण्याचा, इतका आग्रह धराल असं आह्मालाही वाटलं नव्हतं.

**मान०**—राणाजी, आपण आमचा कांहीं उपमर्द केलात तरी त्याबद्दल आह्मी आमच्या मनास कदाचित वाईट वाटूं देणार नाहीं. कारण, आपल्या थोर घराण्या-विषयीं या रायठाण्यांतील सर्वच रजपुतांत तशी विशेष प्रेमादरबुद्धि आहे; पण ज्या कारणावरून आपण आह्माला उघड असं तुच्छ वागवितां तें दिल्लीपतीच्या कानावर गेल्यास त्यांची मात्र केवढी इतराजी होईल, याचा आपण विचार करावा.

**प्रता०**—मानसिंग, अहो दिल्लीपतीच्या मर्जीगैरमर्जी-ची आह्माला काय पर्वा आहे? ज्यांना, त्यांचे अंकित होऊन आपलें बल, आपली बुद्धि आणि आपली स्वामि-

भक्ति त्यांच्या हितार्थ खर्चावयाची असेल, आणि " आर्य-भूमीचे आधारस्तंभ व तुर्कांचे वधस्तंभ " या अर्थाच्या आपल्या आजपर्यंतच्या कीर्तीला कलंक लावायचा असेल त्यांनीं त्याविषयीं जपावं पाहिजे तर. आमचं कुलव्रत वेगळंच आहे.—

( ८ पद ) आर्य धर्म भ्रष्टविति जे तुर्क समरीं लोळवूं ॥ आत्मदेशद्रोह करिती स्वजन जे त्या लाजवूं ॥ दुःख-संतप्त ही भूमि स्वरिपुरक्तें शांतवूं ॥ उक्त कर्तव्य हें करुनी क्षात्रकुल निज शोभवूं ॥

मान०—राणाजी, मोंगलांविषयीं आतां इतकी द्वेष-बुद्धि बाळगण्याचं कारण नाहीं. आह्मी स्वानुभवानं सांगतों कीं, अकबर बादशहा जातीनं मात्र यवन, पण वृत्तीनं अगदीं हिंदु बनला आहे; इकडील एखादा साधुच ह्मटला तरी चालेल.

चित्रभाष—( एकीकडे )—मतलबसाधु तरी आहे खरा. त्या खेरीज अशीं बडीं बडीं धेंडं त्याला आपल्या जाळ्यांत अडकवितां आलीं नसतीं.

मान०—त्याचे उदार विचार, शुद्ध हिंदु तऱ्हेचं वर्तन, सर्वांच्या ठिकाणीं समान दृष्टि वगैरे गुणांवरून त्याला जग-द्गुरु असं लोक ह्मणूं लागले आहेत.

चंडदास—( एकीकडे )—एवढाले मोठे एकेक त्याचे चेले बनल्यावर तिकडे अकबराला जगद्गुरुत्वाचा मान कां नाहीं मिळणार? अरे रे!—

( श्लोक ) ज्यांचें शौर्य प्रखर बघुनी सांडुनी तुर्क गर्व ॥
आले होते किति नरम ते होय कीं व्यर्थ सर्व ॥
त्या वीरांच्या प्रबलहि अशा काय ह्या वंशजांनीं ॥
गावी तुर्कस्तुति, शिव हरे; ऐकवेनाच कानीं ॥

—धिःकार, धिःकार असो, अशा कुलांगारांना !

**मानसिंग**—रजपुतांतील आणि आपल्यांतील वैर व दुजाभाव नाहींसा होऊन ह्या पुढं रक्तपाताचा भयंकर प्रसंग कोणालाच न यावा व एकमेकांच्या दोस्तीनं या देशांत सर्वत्र शांती व आबादानी असावी, हीच अकबराची आतां उत्कट इच्छा आहे. ह्या त्याच्या इच्छेला उत्तरोत्तर आमचे बरेच रजपूत राजे अनुकूल होताहेत, ही फार आनंदाची गोष्ट होय. तथापि आपल्या सारख्यांच्या ठायीं अद्यापहि असा हट्ट, दुराग्रह आणि उच्चनीच भाव आहे असं पाहून खरोखर वाईट वाटतं.

**चित्रभाष**–( एकीकडे ) हा वेदांत सांगायला राजे मानसिंग हे या लष्करी वेषानं न येतां संन्याशी, बैरागी नाहीं तर अवलीया, फकीर जरी बनून आले असते ह्मणजे शोभलं तरी असतं !

**प्रताप०**—अहो मानसिंग, एखाद्याच्या नरडीवर नख ठेवून तो त्याच्या प्रतिकारार्थ धडपडूं लागला असतां, त्याला जीवित क्षणभंगुर असल्याचं ब्रह्मज्ञान सांगूं लागावं, असलं हें अकबरी स्वकार्यसाधुत्व न ओळखण्या

इतकं मूर्खपण निदान या मेवाडांत तरी नाहीं हें आपण पक्कं ध्यानांत ठेवावं.

**चंडदास**–( एकीकडे )—राणाजींनीं हें उदाहरण अगदीं योग्य दिलें.

**प्रताप०**—अहो, आमच्या शांतीवर व संपन्नतेवर बळं धाड पडून जिकडे तिकडे सर्व उध्वस्त झालं असतां व अद्यापही आपल्या सारख्यांच्याच द्वारें तंत त्या तुर्क राक्ष सांकडून चाललेलं पाहात असतां, येथील जातिवंत रज पुतांना जो तळतळाट उत्पन्न होतो तो, तुमच्या या शांति पाठानें किंवा त्यांच्या आपण सांगतां त्या उदारपणाच्य सोंगानं शांत होईल काय ?

**चित्रभा०**–( एकीकडे )—शांत कसा व्हावा? उसन किंवा लावालावीचा थोडाच आहे तो.

**प्रताप०**–अहो तैमुर्लंग अल्लाउद्दीन, बयाझीद वगै एकेक तुर्क राक्षसांच्या या निरुपद्रवी भूमीवर घडलेल्य मागच्या घोर कृति तर असोतच; पण या तुमच्या साधु मूर्तीनींच चितोर येथें जो लक्षावधि स्त्रीपुरुषांचा भयंक संहार व तेथील भूदेवीची दुःसह विटंबना केली त्यां आह्माला विस्मरण व्हावं कसं ?

**दिवाण०**–( एकीकडे )—एकेक त्या घोर प्रसंगांच पक्की आठवण ठेवणारीं तशीं स्मारकंच जागजागीं आहेत तेव्हां ते विसरण्याची गोष्ट कशाला ?

**प्रताप०**—अहो उदारमन, समदृष्टि, भूतदया, निरभिमानवृत्ति इत्यादि तत्वं आह्मांला शिकवायला ते आपके जगद्गुरु नकोत. हे गुण आह्मां आर्यांत स्वयंभु आहेत. या गुणांनुरूप या राक्षसांशीं सरळ वर्तन ठेवण्याला हे कृतघ्न सर्वांशीं अपात्रच आहेत, हें न जाणून आमच्या पूर्वजांनीं वेळोवेळीं त्या आपल्या श्रेष्ठ गुणांचा यांजवर अनुग्रह केल्यामुळंच तर यांचे पाय या देशांत रोवले गेले आहेत. नाहींपेक्षां या राजस्थानची उत्तर मर्यादा अद्याप पर्यंत हिमालय पर्वतच असती.

**चित्रभाष०**—( एकीकडे ) अगदीं खरं आहे.

**प्रता०**—मानसिंग, तुह्माला निश्चयाची एकच गोष्ट सांगून ठेवतों.—

( ९ पद ) ही जोंवरि देना पाहूं ॥ परवशता ऐशी साहूं ॥ भूमीचें ऋण शिरिं वाहूं ॥ तों वरि हा द्वेषाग्नि प्रखरचि कशाहि पर कुटिलास न भुलतां मनांत जागृत ठेवूं ॥ ही जों० ॥

**मानसिंग**—अहो, पण त्या वैराग्नीचा आतां काय उपयोग? तो आपल्याच संतापाला मात्र कारण होईल.

**प्रता०**—अहो, संतापाला तर काय, पण आमच्या निःपाताला कारण झाला तरी आमचा मार्ग हाच आहे.—

( साकी ) कुलशुद्धि स्वातंत्र्य रक्षितां मृत्यु जरीही आला ॥ विषय असे तो आनंदाचा खचिताचि रजपूताला ॥ प्रिय हा मार्ग असे ॥ अनुसरतां यां दुःख नसे ॥

**मानसिंग**—राणाजी, ही भोंवतालची तूर्त बदलले स्थिति आपण लक्षांत आणीत नाहीं हें बरं नाहीं.

**प्रताप०**—आणि आपण तरी ती आणतां आ काय ? अहो मानसिंग—

( सवाई ) मान तुह्मी अपमानास्पद ही परवशता प्रिय मानितसां कां ॥ सिंह असुनि परि गाय बनूनी यवन-व्याघ्रभयें दबतां कां ॥ भूपति तुह्मि असुनि भूदेवी हत-सौभाग्य अशी बघतां कां ॥ आर्यकुलीन मुलीहि अनार्यां देउनि या कुल भ्रष्टवितां कां ॥

**मान०**—तें खरं; पण राणाजी, आज मोंगलांची महती केवढी आहे आणि आपलं दुर्बलत्व किती आहे हें आपण स्वस्थ मनानं पहा, ह्मणजे सांप्रत आमचंच वर्तन युक्त आहे असं आपणास खचित वाटेल.

**प्रताप०**—मानसिंग, आपल्या नांवाला, कुलाला आणि पराक्रमाला अनुचित असे आपल्या मुखांतून हे भित्रेपणाचे शब्द निघतात तरी कसे ? अहो, मोंगलांची महती आणि आमची असहाय स्थिति आपण आह्माला सांगितलीत; पण त्याच बरोबर आपल्या सारखे शत्रुपक्षाला मिळालेले क्षुद्रवृत्ति आमचेच लोक या गोष्टीला किती कारणीभूत आहेत हें आपण मनांत आणलं नाहींत. आमची दुर्बल स्थिति तर खरीच; तथापि आपण हें पकं लक्षांत असूं द्या, कीं—

( अनुष्टुप ) क्षत्रियांचें बीज सारें नष्ट नाहींच जाहलें ॥ मातेचें दुग्धही त्यांच्या निस्सारत्व न पावलें ॥ भूमीतें

पूर्ण दुर्भाग्यें नाहीं आजच घेरलें ॥ संगबाप्पादि वीरांचें पुण्यही नाहिं संपलें ॥

—आणि इतकंही सर्व झालं असलं तरी खऱ्या सिंहाला आपल्या दुर्बलत्वाची किंवा आपणाला कोणी पाठबळ नसल्याची क्षिति कधींच नसते हें आपणास माहीत असलं पाहिजे.

**मानसिं०**—राणाजी, आपण जरा शांतमनानं विचार करा. बादशाही सार्वभौम सत्तेविरुद्ध आपली ही दांडगाई, व्यर्थ होणार आहे.

**प्रताप०**—( अधिक त्वेषानें ) काय ? काय ह्मणतां ? ती सार्वभौम सत्ता, आणि आमची ही त्याविरुद्ध दांडगाई ? ह्मणजे या भूमीच्या सौभाग्यावर बळं धाड घालणारे ते लुटारू, घातकी, दरवडेखोर, राक्षस इथले धनी, आणि आम्ही त्या भूमीचे रक्षक, स्वामी ते चोर बंडखोर काय ? वाहवा, मानसिंग आपण हें भाषण करतांना आपल्या रजपूत शीलासहि अगदींच विसरलांत यांत संशय नाहीं.

**चंडदास**—( एकीकडे ) पण राणाजी यांस अद्यापि रजपूत समजताहेत हीच मोठी चूक होय. कारण—

( श्लोक ) उध्वस्त हा देश समस्त ऐसा ॥ उच्छेदिला धर्महि सर्व तैसा ॥ हें पाहवें स्वस्थपणें जयाला ॥ कैसें ह्मणावें रजपूत त्याला ॥

**मानसिं०**—राणाजी, आपल्या या विलक्षण आग्रही स्वभावामुळं आपली आतां समजूत घालतां येणं कठीण आहे.

**प्रताप०**—आणि अशा पूर्ण भ्रष्ट आपल्या अंतःकरणाला आतां आपलेपणाची ओळख पटवून देणंही तितकंच कठीण आहे !

**मानसिं०**—छेः, आपण आमचा आज उपमर्द फार केलात. असो, आपला आम्ही सर्व सत्कार घेऊन पावलों. पण जातां जातां आपणास एवढंच सांगावयाचं कीं, हा आपला मानीपणा आपणाला फार जड जाईल.

**प्रताप०**—जाहो, आमचा जातिवंत गुण आह्माला जड वाटण्याइतकं हलकं अंतःकरण आमचं होईल, त्या दिवशीं हा देहही मग तशा क्षुद्रस्थितींत राहण्यापेक्षां धारातीर्थींच पावन होण्याला सिद्ध होईल. समजलांत.

( मानसिंग व त्याची मंडळी रागानें निघून जातात. )

**दिवाण०**—राणाजी, आपल्याला फार श्रम झाले आहेत, थोडी विश्रांति घ्यावी.

**प्रता०**—आतां विश्रांति कशाची? संकल्प केलेल्या कठिण व्रताचा येथून हा 'श्रीमन्महा' च झाला आहे. त्यांत वाईट इतकंच कीं, या मंगलाचरणांत अमंगल कृतीच्या या रजपूताशीं थोडावेळ तरी संसर्ग घडला. चलतर, त्याबद्दल सचैल स्नान करून शुद्ध होऊं. कारण—

( साकी ) **निजदोषांचें शासन दोषी एकला न तो भोगी ॥ होय अंशतः वांटेकरिही त्याचा जो संसर्गी ॥ यास्तव शास्त्र वदे ॥ दुर्जनसंगाहि घडों न दे ॥**

( दोघे शिपाई खेरीज करून सर्व जातात. )

१ शिपाई०—अरे अरे जा धांव. या वाढलेल्या पानांचं
ाय करायचं तें दिवाणजींना विचारून ये. जा.

२ शिपा०—त्यांनीं मघांच सांगितलं आहे कीं तुह्माला
टेल ती त्याची व्यवस्था करा. त्या भ्रष्ट मानसिंगाच्या
ांवानं तयार केलेल्या त्या अन्नाचं आम्ही कोणी सेवन
रणार नाहीं.

१ शिपा०—तर मग आपणही तें खाणार नाहीं.
न्न खावं तशी बुद्धि होते ह्मणतात. ते मानसिंग त्या
ंगलाचं अन्न खातात ह्मणून तर रजपूत बाण्याला अगदीं
ुट अशीं नामर्दपणाचीं भाषणं त्यांनीं केलीं, ऐकलींस ना?

२ शिपा०—मग तर त्या मघांच्या भिल्लास तें देऊन
क. आतांपर्यंत इथंच ही मौज पहात उभा होता तो,
बघ.

( भिल्ल येतो. )

१ शिपा०—( भिल्लास ) ए गड्या, तुला मघां धाकट्या
ाराजांनीं जीवदान दिलं, त्यावर ही घे आणखी बक्षिशी.
तंबूमध्यें वाढून ठेवलेलं, अन्न जा सारं घेऊन. दोन दि-
पोरांबाळांसह तुझी रग्गड चैन होईल बेट्या !

भिल्ल—नगरे बा तें आपल्याला. त्या बेमान लोकांचं
लेलं अन्न कुणी खावं ? दादा तुमी आमची थट्टा करूं
ा. आमी भिल्लाचं बच्चं, ही भुई आमची मायपोट.
ग्याशीं बेमान झाल त्येंचा समाचार आमच परतापसिंह

म्हाराज घेनार हाएती, त्येला बघा आमी या रायठान्यांतल संमद भिल्ल येक होऊनशानी मदत करूं. आमच तरी यिमान बघा की, तुमी.

२ शिपा०—मग गड्या तूं तर आमचा पक्काच दोस्त झालास. चला तर त्या अन्नाची व्यवस्था आतां अशी करून टाकूं या. ( पुढील गाणें तिघे मिळून ह्मणतात. )

( गाणें ) अन्न टाकूं गाडून ॥ भांडीं टाकूं फोडून ॥ कनाथ तंबू डेरे सारे पार टाकूं फाडून ॥ नांगर आणूं जोडून ॥ जमीन काढूं खरडून ॥ गंगेचें पाणी आणून वरती देऊं शिंपडून ॥ १ ॥

( पडदा पडतो. )

---

# अंक दुसरा.



( प्रवेश १ ला—स्थळ, उदेपूरच्या राजवाड्यालगतची बाग.—पात्रें, चंपा व मोहना ह्या दासी फुलें तोडताहेत असा देखावा. )

**मोहना**—चंपे चंपे, अग पण थांब जरा. मला येऊंदे.

**चंपा**—चल तर मग लौकर. एखाद्या उठवणीला आलेल्या गुराप्रमाणें. मोहने, तुझं पाऊल आपलं नेहमीं जड !

**मोहना**—बरं बरं, ठाऊक आहे आपण कितीशा चपळ आहांत त्या. रोज गौरी भोंवतीं फेर धरतांना आपली तारंबळ मी पहात असत्यें पण !

**चंपा**—अग आपल्याला फुलं तोडायला आल्याला बराच वेळ नाहीं का झाला? वाड्यांत गौरी निघायची मघांच अगदीं तयारी झाली होती. तिकडे आपला बोभाटा होऊन अशा आनंदाचेवेळीं उगच रागं भरून घ्यावं लागेल, ह्मणून ह्मणत्यें. त्यांतून तुझं ठीक आहे. तुला एक राणीसाहेब कदाचित नाहीं बोलणार; पण आमच्या कुंवरबाईंची अलीकडली तब्यत तुला माहीत आहेना; जरा कांहीं कमी पडलं कीं तेव्हांच मर्जी जाते.

**मोहना**—अंगांत तारुण्य भरूं लागलं आहे, तेव्हां वयाप्रमाणं ह्या चेष्टा ठीकच आहेत.

**चंपा**—कसल्याग वयाप्रमाणं चेष्टा! अग स्वभावच आतांशा कांहीं विलक्षण झाला आहे. त्या साद्रीचे राजपुत्राचा कसा अपमान केला होता, हें तुला माहित आहेच. ह्मणे मी श्रीमान माहाराजाधिराज महाराण्याची मुल्गी, त्या यःकश्चित संस्थानिकाच्या मुलाची बायको मुळींच होणार नाहीं. असं ह्मणून तिकडनं मागणीकरितां आलेला नारळ बेलाशक परत केला होता!

**मोहना**—मग? मुलगी कोणाची? आमचे महाराज महामानी आहेत, तोच गुण त्यांच्या या मुलींत उतरला हें ठीकच.

**चंपा**—होय, पण तो मानीपणा दाखवायचा तिथंच दाखविला पाहिजे. महाराजांनीं आपल्या बरोबरीचे बहुतेक

राजे मोंगलांशीं अनेक प्रकारच्या हलक्या संबंधामुळं भ्रष्ट झालेले पाहून, आपल्या मुली मांडलिक किंवा आपल्याहून कमी योग्यतेच्या पण शुद्ध राहिलेल्या, दूरदूरच्या इतर स्वतंत्र रजपूत राजांच्या मुलांना देण्याचा जो निश्चय केला आहे, तो कांहीं त्यांचा असा अपमान करण्याकरितां नव्हे हें खचित !

**मोहना**—तर काय, महाराजांना रामकुंवरबाईचं हें वर्तन आवडलं असं तूं समजतेस होय?

**चंपा**—अग ज्याअर्थी मग महाराजानींही पण हट्टानं त्याच राजपुत्रांशीं त्यांचं लगीन लावलं, त्याअर्थी त्यांना त्यांचं हें करणं आवडलं नाहीं हें उघडच आहे.

**मोहना**—अग, इतकंच नाहीं, पण केलेल्या अपमानाबद्दल आपल्या नवऱ्याची क्षमा मागून कुंवरबाई त्यांची मर्जी आपल्यावर बसवून घेत तोंपर्यंत महाराजांनीं अलीकडे त्यांना आपल्या दृष्टीं पडण्याचंही बंद केलं आहे.

**चंपा**—महाराजांचा निश्चय तो; कध्धीं फिरायचा नाहीं.

( चमेली धाई घाईनें येऊन. )

**चमेली**—अग तुह्मी इतका वेळ इकडेच काय करीत आहां! वः, तुमच्या तर स्वस्थ गोष्टी चालल्या आहेत. वाड्यांत चला लौकर. सर्व सरदार मानकऱ्यांच्या इथल्याही गौरी वाड्यांतच जमा होऊन एका मेळ्यानं आतां बाहेर पडतील.

**चंपा**—हें काय? एका मेळ्यानं ह्मणजे !

**चमेली**—अग लढाईचा विचार करण्यासाठीं होणारा मोठा दरबार आजच भरवावा असं ठरल्यामुळं नेहमींच्या परिपाठा प्रमाणं ठिकठिकाणच्या गौरींचं दर्शन घेऊन सर्वांच्या उत्सवाचा गौरव करायला महाराजांना अवकाश नाहीं, ह्मणून ही व्यवस्था केली आहे.

**चंपा** ( त्रासानें )—बरं झालं बाई, या मेल्या मोंगलांचा कधीं एकदां पुरता सत्यनास होऊन जाईल कोण जाणं. यांच्या पायीं आधींच आमच्या सर्व मौजा आणि आनंदाचे समारंभ महाराजांनीं बंद केले आहेत, आणि हा देवाचा उत्सव ह्मणून थोडा कुठं चालू असणार, तर त्यालाही असा व्यत्यय.

**चमे०**—बरं पण, तुह्मी इथं नका गडे अशा गमूं. महाराजांची स्वारी मघांच तयार होऊन उदेसागर तलावाकडे पुढं गेली सुद्धां. ( ऐकून ) हा पहा नगारा वाजूं लागला. जा जा कशा.

**मोहना**—पण चमेली, आह्माला असं घाईनं पुढं लावून देऊन आपली धिंडका कोणीकडे निघालीही ?

**चमेली**—अग, दरबाराकरितां बरेच राजेरजवाडे आले आहेत, त्यांत साद्रीहून कोणी आले आहेत कीं नाहीं हें पाहून यायला राणीसाहेबांनीं मला सांगितलं आहे. त्या

प्रमाणं मी आतां शोध घेऊन ही तुमच्या मागोमाग येत्येंच. ( जाते. )

**चंपा**–बरं तर चला गडे आपण तरी जाऊं.

( दोघी जातात. )

---

( **प्रवेश २ रा–स्थळ**, उदेसागर तलावाकडील रस्ता.–**पात्रें**, प्रतापसिंह व दोघे भाट. )

**चित्रभाष०**–राणाजी, ऋतुप्रसंगानं हें या वेळीं इथं स्वभावतांच प्रकट झालेलं सृष्टिसौंदर्य पहावं. आपल्या उद्विग्न मनाला यापासून कांहीं आराम वाटेल.–

( साकी ) **निरभ्र वर आकाश खालतीं सुपीक हा भू-भाग ॥ सभोंवतालीं नरनारीजन उत्सवरंगीं दंग ॥ प्रसन्न सर्व दिसे ॥ ऋतुचें वैभव ही विलसे ॥**

—आणखी असं पहा.—

(१ पद) **सृष्टि वैभवा या बघुनी वाटे मज चित्तीं ॥ सुवर्ण पट जणुं नेसुनी आली वासंती ॥ सुगंधमंदचि वायु हा ॥ श्वास तिचा भासे ॥ हास्यचि करिते काय या विकसित पुष्प मिसें ॥ कोकिलभृंगस्वन सारे मंजुल गान तिचें ॥ प्रसन्नता ही सर्वांची सौभाग्यचि साचें ॥**

**प्रता०**–चित्रभाष, अहो ऋतुपरत्वें या प्रदेशाला असं किती जरी रमणीयत्व आलं असलं, तरी मला दृष्टि-विषय तूर्त कांहीं वेगळाच झाला आहे–

( दिंडी ) **पारतंत्र्याच्या अग्निनें समोर ॥ जळत जोंवरि हें चितेसम चितोर ॥ तंवर मेवाड स्मशानसें जाणा ॥ कशाची ती सुप्रसन्नता आणा ॥**

प्रमाणं मी आतां शोध घेऊन ही तुमच्या मागोमाग येत्येंच. ( जाते. )

**चंपा**—बरं तर चला गडे आपण तरी जाऊं.

( दोघी जातात. )

---

( **प्रवेश २ रा**—**स्थळ**, उदेसागर तलावाकडील रस्ता.—**पात्रें**, प्रतापसिंह व दोघे भाट. )

**चित्रभाष०**—राणाजी, ऋतुप्रसंगानं हें या वेळीं इथं स्वभावतांच प्रकट झालेलं सृष्टिसौंदर्य पहावं. आपल्या उद्विग्न मनाला यापासून कांहीं आराम वाटेल.—

( साकी ) **निरभ्र वर आकाश खालतीं सुपीक हा भू-भाग ॥ समोंवतालीं नरनारीजन उत्सवरंगीं दंग ॥ प्रसन्न सर्व दिसे ॥ ऋतुचें वैभव ही विलसे ॥**

—आणखी असं पहा.—

(१ पद) **सृष्टि वैभवा या बघुनी वाटे मज चित्तीं ॥ सुवर्ण पट जणुं नेसुनी आली वासंती ॥ सुगंधमंदचि वायु हा ॥ श्वास तिचा भासे ॥ हास्यचि करिते काय या विकसित पुष्प मिसें ॥ कोकिलभृंगस्वन सारे मंजुल गान तिचें ॥ प्रसन्नता ही सर्वांची सौभाग्यचि साचें ॥**

**प्रता०**—चित्रभाष, अहो ऋतुपरत्वें या प्रदेशाला असं किती जरी रमणीयत्व आलं असलं, तरी मला दृष्टि-विषय तूर्त कांहीं वेगळाच झाला आहे—

( दिंडी ) **पारतंत्र्याच्या अग्निनें समोर ॥ जळत जोंवरि हें चितेसम चितोर ॥ तंवर मेवाड स्मशानसें जाणा ॥ कशाची ती सुप्रसन्नता आणा ॥**

—आणि तुह्मीं वर्णन केलात तो प्रसन्नतेचा रंगही पण आतां लौकरच बदलणार आहे.—-

( पद ) जरी स्वच्छ आकाश दिसतसे रणधूळीनें परी॥ खचितचि भरेल हें लौकरीं ॥ स्वपर दळांतिल वीर नाचतिल सुपीक या भूवरी ॥ होय ती रक्तमांसमय खरी ॥ उदास भेसुर देखावा हा बघुनी जन अंतरीं ॥ कशाचा उत्सव तो मग धरी ॥

( दिवाणजी येऊन मुजरा करतात. )

**दिवाण**०—राणाजी, राजे मानसिंग यांच्या मानभंगाच्या निमित्तानं दिल्लीहून आपणावर चालून येत असलेल्या बादशाही लष्कराला तोंड देण्यासाठीं आपण आपलं कनकसूर्यांकित युद्धाचं निशाण उभं करून चोहोंकडे द्वाही फिरवल्याप्रमाणं आज बरेच राजे, महाराजे, राव, रावळ, ठाकूर तसेच आपले पटावत सामंत सरदार वगैरे आपापल्या लवाजम्यासह मोठ्या ईर्षेनं येऊन दाखल झाले आहेत. सुमारं दहावीस हजार सैन्य जमेल असा अदमास आहे.

**प्रता**०—भाग्यच या भूमीचं ह्मटलं पाहिजे, किं तिच्या विपन्न दशेकडे पाहून इतक्यांचीं तरी हृदयें अद्याप कळवळताहेत एकूण! बाकी राणासंगाच्या वेळेला आणि आतांला हें किती अंतर पडलं आहे हें पाहिलंत ना ?

**चंडदा**०—खरं आहे.

(आर्या) ऐंशी हजार नुसते संगाच्या स्वार असति सेनेंत ॥ राजेरावळरावाहि होते ते कैक त्यासवें निघत ॥ नाहीं पदातिची मिति चाले रणमस्त पांचशें हत्ती ॥ तो सेनाब्धि बघूनिच रिपुंनीं तैं धाक वाहिला चित्तीं ॥

**चित्रभाष**—अहो, हा सर्व या मोंगल बादशहांच्या अलीकडील कारस्थानाचा प्रभाव आहे. त्यामुळंच आमच्या एकंदर रजपूतराजांचीं मनं सांप्रत अगदीं चंचळ होऊन गेलीं आहेत.

**चंडदास**—बरोबर ह्मणतां आपण.—

(चर्पटपंजरी) दिल्लिपतीचे हस्तक व्हावें ॥ किंवा राणाजींस मिळावें ॥ त्यांचें होय द्विधा मन ऐसें ॥ शील जसें तद्वर्तन तैसें ॥ स्वकुलाचा ज्यांना अभिमान ॥ त्यांना तुच्छ शहाचा मान ॥ परि जे असती क्षुद्र मनाचे ॥ दास्य पत्करिति दिल्लिपतीचें ॥ उन्नत वृत्ति परंतु ज्यांची ॥ होते स्मृति त्यांना ती तुमची ॥ योग्य गमतसे हा क्रम त्यांतें ॥ स्वकीय देशा उद्धरण्यातें ॥

**प्रता०**—बरं पण दिवाणजी, साद्री संस्थानचे अधिपति आमचे व्याही झालाशामसिंहजी आले आहेत काय ?

**दिवाण०**—होय, त्यांची स्वारी नुकतीच आली. आणि बरोबर कुमार रत्नसिंगजीही आहेत.

**प्रता०**—यावरून आमच्या मुलीच्या उद्धटपणानं त्यांचा जो अपमान झाला होता त्याविषयीं त्यांच्या मनांत आतां कांहीं वैषम्य राहिलं नसावं असं दिसतं.

**दिवाण०**— झालाशामसिंहजी फारच सुज्ञ आहेत. सहज त्या अपमानाबद्दल गोष्ट काढतां तो वृद्ध जवान एकदम मला थांबवून ह्मणाला, दिवाणजी, साऱ्या देशांवर आलेल्या संकटाचं निवारण करण्यांत अशा खाजगी गोष्टींचं वैषम्य मनांत ठेवून उदासीन राहणं हें अत्यंत अधमपणाचं कृत्य होय असं आम्ही समजतों. अशा रीतीनं आम्ही आपल्या कर्तव्याला कुचर, होऊं तर मग राणाजींची मुलगीच काय, पण त्या मुलीच्या दासदासीही आह्मांला अगदीं क्षुद्र लेखतील !

**चित्र०**—वाहवा, फारच योग्य भाषण हें.

**प्रताप०**—ठीक आहे, दिवाणजी, आपण पुढं होऊन दरबारची तयारी ठेवावी. आम्ही हा गौरीचा समारंभ उरकून परस्पर तिकडेच येतों.

( दिवाणजी जातात. महाराज माधोसिंग येतात. )

**चित्रभाष** ( पाहून )—हे देलवाड्याचे महाराज माधोसिंग इकडे येत आहेत. यावं माधोसिंग, यावं !

**माधोसिं०** ( मुजरा करून )—महाराणाजींचा विजय असो !

**चित्रभा०**—अहो माधोसिंग, आजकालचा राजमार्ग हा नव्हे. तो दिल्लीकडे वळला आहे.

**चंडदा०**—आणि जयशब्द व नमनविधिही पण असा नाहीं—

(श्लोक) खुदावंत खाविंद हे शब्द आतां ॥ मुखीं लागती वागवावे समस्तां ॥ पुढें वांकवूनी शिरींचें ललाम ॥ करावा पडे भाग आतां सलाम ॥

माधो०—तूर्त आपणाला असं ह्मणतां यावं हें ठीकच आहे. आज अंबर, मारवाड, बिकानेर, बुंदी, बुंदेलखंड, जेसलमीर इत्यादि बऱ्याच ठिकाणचे रजपूत राजे तुर्कांचे नातेवाईक व त्यामुळें त्यांच्या पक्षाचे अभिमानी झाले आहेत हें खरं आहे. तथापि राणाजी, या तरवारीची शपथ घेऊन मी आपल्याला सांगतों कीं, या भूमीचं स्वातंत्र्य आणि आपल्या आर्य कुळाचं पावित्र्य रक्षण करण्यासाठीं आपण अभिमानपूर्वक जें प्रखरव्रत धारण केलं आहे, तें ऐकून अद्यापही कांहीं रजपूत राजे आपल्यालाच अनुसरून साह्य करायला तयार आहेत. आणि त्यांपैकींच हा एक आपला नम्र सेवक होय. ( तरवार पुढें ठेवून गुडघे टेंकून बसतो. )

प्रता०—वाहवा माधोसिंग, आपल्या सारखे निश्चयाचे एकेक शूरवीर आमच्याकडे थोडे असले तरी अशांच्या साह्यानं आह्मी राजे मानसिंग यांस या वेळीं अपूर्व युद्ध-चमत्कार दाखवूं यांत संशय नाहीं. ( त्याला उठवून तरवार परत देतो. )

( श्लोक ) नाहीं कित्येक वर्षें रिपुरुधिर जिला प्यावयाला मिळालें ॥ त्या योगानेंच जीचें मुख मलिन नव्हे वाटतें म्लान झालें ॥ ती ही तलवार आतां अरिवरि

समरीं चालुनी तृप्ति पावो ॥ माखोनी रक्तमांसें स्वतनुहि रणिंच्या देवता शांत होवो ॥

—असो माधोसिंग, हा गौरीचा समारंभ पाहून बरोबरच दरबारास जाऊं.

चित्रभाष (पडद्याकडे पाहून)—ह्या पहा आल्याच त्या गौरी

( ३ पद ) येति ह्या गौरिसह मृगनयना ॥ ये० ॥ वेष मनोहर लेवुनि सुंदर ॥ करीत येती गायन सुस्वर ॥ धरिति कलश शिरिं शशिवदना ॥ येति० ॥ चंचल चपलेसम ह्या चमकति ॥ नृत्यगतिपदें येतां ठुमकति ॥ प्रसन्न करिती खिन्न मना ॥ येति० ॥

( वर्णन केल्याप्रमाणें नागरिक स्त्रियांचा समूह गौरी घेऊन पुढील पद्य गात हळु हळु येत असलेला दृष्टीस पडतो )

( ४ पद ) मिरवित गौरि चला ग नेऊं ॥ मि० ॥ नाचूं फेर धरुनि तिज भंवतीं ॥ सुस्वर गाणीं गाऊं ॥ सख्यांनों गौरि चला ग नेऊं ॥ मिरवि० ॥ झोंपाळ्यावरि तिला रुप्याच्या ॥ बसवुनि झोंकें देऊं ॥ सख्यांनों गौ० ॥ स्नान तिला घालाया साजणी ॥ नौकेमध्यें घेऊं ॥ सख्यां० ॥ उत्सव करुनि असा आनंदें ॥ परत घरीं मग जाऊं ॥ सख्यांनों ॥

( गौरी तळ्याच्या कांठीं ठेवून तिची पूजा करतात व पुढील पद्य ह्मणत तिच्या भोंवतीं फिरतात. )

( ५ गर्भा ) ती अवन करो श्री शिवगौरी कीं आमुचें ॥ हे सदां महोत्सव आनंदानें करूं तिचे ॥ देशास करो संपन्न अन्नपूर्णा ती ॥ वीरांत आमुच्या ठेवो ती निजशक्ति ॥ ती देवि भयंकर रूप धरो दुर्गेचें ॥ संहारो रिपु आमुच्या देशधर्माचें ॥

( हें पद्य संपण्याच्या सुमारास राणी व दासी येतात. )

प्रता० ( राणीस )—कः, आपण ह्या अत्तांच येत आहां वाटतं ?

राणी—निघाल्यें होत्यें सगळ्यांबरोबरच; पण तितक्यांत कुमार रत्नसिंगजी आल्याचं कळलं; तेव्हां ह्मटलं अशा उत्सवाचे वेळीं तेही जवळ असतील तें बरं, ह्मणून लालजीस बरोबर देऊन पुरोहितांना तिकडे पाठिवलं आणि मी इकडे आल्यें. ( पडद्याकडे पाहून ) अगबाई, आलेच ते. उदंड आउक्ष आहे बरं कां !

पुरोहि०—कोणाला तें ? मला का उदंड आउक्ष !

राणी०—हो; तुह्मालाही कां नको ?

पुरो०—नकोरे बोवा. अहो जगलों इतके दिवस, एवढ्यांत आम्ही काय दिग्विजय लावला आहे, तो पुढें आणखी त्याची आशा करायची. बाईसाहेब, आमच्या सारख्यांनीं अधिक जगणं ह्मणजे अधिक हालांत दिवस काढण्याची तयारी करणं होय ?

राणी—असं कां बरं ? याचं कारण ?

पुरो०—अहो कारण हें ह्मातारपण; असं पहा—

( अभंग ) वृद्धाचा कंटाळा करीतात सारे ॥ त्याचींच पोरें त्याला बिटती ॥ जो तो घरींदारीं हाड हाड करी ॥ रोगी कुत्र्यापरी धुडकाविती ॥ करीती अपमान लागतात पाठीं ॥ ' साठी बुद्धि नाठी ' हीणवीती ॥ या साठींच वाटे यम कृपा करी॥लौकर ती बरी आह्मा वृद्धां॥

—तेव्हां ह्मणतों. आह्माला आतां उदंड आयुष्य नको.

तें या राजबिंड्यांना आणि तसंच या देशाचं नष्टचर्य निवारण करण्याचं व्रत धारण केलेल्या आमच्या महाराणाजींनाच असो. गौरीशंकरांनीं यांनाच दीर्घायु करावं. बरं पण, बाईसाहेब, हे आपले जांवईबोवा संभाळा कसे. काय सांगू आपले जांवई खरोखरच नांवाप्रमाणं अगदीं रत्न आहेत रत्न. नाहींतर जांवई ह्मणजे किती तब्यतखोर असायचे. पहा—

( चर्पटपंजरी ) थोड्याशाहि निमित्तें रुसती ॥ दिलें किती तरि तुष्टचि नसती ॥ हजार वेळां पायां पडविति ॥ गुणें अशा जांवाई ह्मणविति ॥

—पण असले कांहीं एक दुर्गुण यांचे अंगांत नाहींत बरंका. आपल्या मुलीकडून त्यांच्या झालेल्या अपमानाचा प्रतिकार करण्याची कोणती ईर्षा धरून, ते हल्लीं आपले वडिलांबरोबर इकडे आले आहेत, हें आतां त्यांच्याच मुखानं आपण ऐकून घ्या ह्मणजे आपली खात्री होईल.

**राणी०**—मग तें कळलं तर बरं होईल.

**प्रता०**—आह्माला देखील ऐकण्याची इच्छा आहे.

**रत्नसिं०**—तर मग मी सांगतों, आपण ऐकावं. अहो—

( ६ पद ) जरि वादविवाद स्नेह विवाहहि समानांत तो दिसे बरा ॥ परि कांहिं हेतुनें असा घडुनिये शरीरसंबंध हा खरा ॥ तरि रणामधें निजशत्रुवधें करुं अतां तुह्मासह बरोबरी ॥ मग असे आमुची कमी योग्यता सहजच ती होईल पुरी ॥

पुरोहित—बाईसाहेब, ऐकलंतना हें !

राणी०—हें रामकुंवरनं ऐकायला पाहिजे. ह्मणजे निष्कारण आपल्या पतीचा आपण उद्धटपणानं अपमान केल्याचा तिला पश्चात्ताप वाटून सर्वांना प्रिय अशीच ती या पुढं अधिक विनयानं वागूं लागेल.

चित्र०—वाहावा! या भाषणानं कुमारजींनीं आतांच आपण कोणत्याही प्रकारें योग्यतेनं कमी नाहीं असं दाखविलं. शाबास कुमारजी, आपला हा निश्चय राणाजींच्या योजनेस अनुसरूनच आहे. अहो—

( साकी ) विवाह संबंधें या तुमचा निवेश थोरकुळांत॥ त्याचा हेतुच कीं तत्तेजोगुण उतरोत तुह्मांत ॥ ऐकुनि हे बोल ॥ वाटे होइल तो सफल ॥

प्रता०—बरोबर ह्मणतां आपण; तथापि रत्नसिंहजी, जोंपर्यंत शत्रूंचा निःपात करायला आमच्या तरवारी तयार आहेत तोंपर्यंत देशावरील कसलंही संकट निवारण करण्याची काळजी आह्मालाच असूं द्यावी. हा लढाईचा प्रसंग निघून जाईपर्यंत आमचीं मुलंमाणसं कोमळमिरच्या किल्यावर जाऊन राहायचीं आहेत. तेव्हां आमच्या लालजी बरोबर आपणही तिथंच असावं असं आह्माला वाटतं.

रत्न०—आपली योजना असेल तसं बाकी युद्धप्रसंग आह्माला अत्यंत प्रियच आहे—

( ७ पद ) देतसे रणप्रसंग उत्साहाचि क्षत्रिया ॥ समररणावेशभरें ॥ उडवीतां शत्रुशिरें ॥ स्फुरण चढे त्यापुढें न हर्षविषय कांहिं त्या ॥

25G564

प्रता०—असो, मला वाटतं गौरींचा स्नानपूजादिविधि आटोपला आहे; तेव्हां (राणीस) आह्माला आतां दरबारास जाण्याची मोकळीक असावी. (पुरोहितास) लालजी आहेत, कुमारजी आहेत, तेव्हां पुढील विधीला आमचीच गरज आहे असं नाहीं.

पुरोहि०—हरकत नाहीं. तेही यजमानच आहेत. मात्र छोटेयजमान तेव्हां ह्मटलं दक्षिणाहि छोटिच मिळा—

राणी०—पण मी आहेंना मोठी दक्षणा द्यायला! (राणाजी, भाट, सरदार वगैरे जातात.) यांना सारी दक्षणेची काळजी!

पुरोहि०—करतां कसं. भटाचं सर्वस्व काय तें तेंच.—

(श्लोक) जरी आदरें होय आतिथ्य मोठें॥ विना दक्षिणे तथ्य कांहीं न वाटे॥ मिळालें जरी भोजनाही यथेष्ट॥ परी दक्षिणेवीण ते सर्व कष्ट॥

राणी०—खूपच एकूण आपल्या दक्षिणेचं महात्म्य आहे! तर मग मला ती आधींच देऊन टाकिली पाहिजे. ही घ्या (एक मोहोर दक्षिणा देऊन नमस्कार करते.)

पुरोहि०— अष्टपुत्रा सौभाग्यवतीभव! (इतर बयांस उद्देशून) बायानों आतां या कुमारांचं औक्षण करा कसं.

(तिघी बाया पुढील पद्यांतलें एकेक चरण ह्मणत त्यांतील अर्थानुरूप कुमाराचं औक्षण करतात व शेवटचें चरण सर्वजणी ह्मणतात.)

(८ पद) राजकुमारातें॥ करूं या चला ग औक्षण तें॥ ॥ रा०॥ यशैश्वर्यसौभाग्यानिदर्शक कुंकुम लावित्यें॥ सखे मी॥ उदंडायु हो ह्मणुनि अक्षता मस्तकिं टाकीत्यें॥

मंगल दीपक घेउनि हातीं मी ओंवाळीत्यें ॥ सखे ग ॥ प्रार्थुंया टळो अमंगल तें ॥

( सर्व बाया पुढील पद्य ह्मणत गौरीभोंवतीं फेरधरून नाचतात. )

( ९ गर्भा ) भावें वंदुं आह्मी गौरीशंकराला ॥ अखंड भाग्य हें ॥ सखयांनो ॥ लाभो आह्माला ॥ भावें० ॥ गौरी देई समृद्धि होउनि अन्नपूर्णा ॥ रूपें दुर्गेच्या ॥ सख० ॥ मारी शत्रूंना ॥ भावें० ॥ जेव्हां अन्नपूर्णा ती ध्यान सौम्य तीचें ॥ घेतें कमल करीं ॥ सख० ॥ पात्रहि अमृताचें ॥ भावें० ॥ व्याघ्रारूढ असे ती दुर्गा जेव्हां ॥ मुद्रा क्रूर धरी ॥ सख०॥ शस्त्रेंही तेव्हां ॥ भावें० आह्मा देवी रक्षो ह्मा दोन्ही रूपें ॥ नांदो सुख शांती ॥ सख०॥ शिवगौरीसुरूपें ॥ भावें० ॥

( पडदा पडतो. )

---

# अंक तिसरा.

(प्रवेश १ ला—स्थळ, हळदी घांटाचे मैदानावरील मोगलांची छावणी—पात्रें, गाझीखान व शहाबाझखान दोघे सरदार. )

**गाझी०**—भाई शाबाझखां, इस मानसिंगके केहनेसे हम मेवाडपर चढाई करके आए तो सही. लेकीन ऐसी खबर मिली है के, आपने साथ लढाई करनके वास्ते ये हलदीघांटके मैदानपर उदेपूरके राणानें बावीस हजार राजपूत एकठे किये हैं. इतनी फौज राणाके झेंडाके नीचे जमा होगी ये हमकु बिलकुल यकीन नथा.

शहाब०—इस्से ये मालूम होता है के, रजपूतोंकी लडकीयोंके साथ शादीयां करके उनकू बडे बडे ओदे देकर उनका दिल आपने कबजाबे करनेकी हिकमत जो आपने बादशहाने निकाली है वो मुकमल नही हुई. अबी तक बहोतसे रजपूत राजे इसके जालसे बाहार रहगये हैं.

गाझी०—तो मै युं ख्याल करताहुं, के यही सबब है, के ये चढाई करनेकी बादशहाकी खुशी न होती. ये सब शहाजादा और मानसिंगकी झीदसे हुवा है.

शहाबा०—ये हुमला न करना इसका कुच येही सबब नथा. थोडे दिनसे हम देखते हैं के इन काफरोंपर चढाई करके इनको आपने ताबेमें लाकर दीने महमदीके फैलानीकी बादशहा सलमतकी कुच आर्जु नाहीं.

गाझी०—बस्स, इसीलिये तो राणा इतनी गडबड कर रहा है. नही तो ये येक कांटा निकालकर कुल हिंदुस्थानकु एक रसूलके जेरपाया करना कुच बडी बात नथी.

शहा०—देखो बादशहाका दिल इस तरफसे फेरनेकी सब जड वो एक पाजी अबुल फाजल है ! उसकु आपने इलमका इतना फकर होगया है के, भरे, दरबारमेभी वो काजी, मुल्लाओ, कुराणशरीफ और हजरत साहेबके गुन्हा चुनकर, उनकी बेहिजती करता है. उसने बादशहाकु पैघंबरका नया खताब् देकर, सब धरमोंका “ ताहिद–इ–इलाही ” नाम येक धरम बनाया, और

कुल्दुनियामें उस धरमकु फैलानेके लिये बादशहाकु मशगुर कर दिया है.

**गाझी०**—बराबर; फिर, हरतऱ्होंसे इन राजपूतोंका मुलूकही नही मगर उनकी जानोमाल आपने कबजामे करके, महमदी हुकूमत उनपर करनेकी बादशाहकी पेहली कोशेस बिलकुल नहीरही; ओर रियासदके कामसेभी उनका दिल हटगया. लेकीन, खांसाहेब, इसका नतीजा क्या होगा?

**शह्बा०**—अजी नतीजा क्या? एक बादशहाका दिल फिरनेसे तुमारे हमारे जेसे हजारों मोंगल सरदारोंका दिल इसतरफसे कुच थोडाही फिराहे? एक हाथमे समसेर और दुसरे हातमे कुराण पकडकर हमेषा हुमले करके, इन काफरोंका जोर कमती करनेके लिए हमारी कोशीस जारी है. सिवाय इसके शहाजादेकीभी मर्जी आपने साथ है. अबीतक उसकु बादशहाकी माफक कोई बदमाष सला देनेवाला नहीं मिला.

**गाझी०**—खुदा करे, कबी ना मिले!

**शहाबा०**—शहाजादेके दिलमे इन काफरोंके वास्ते जितना हुस्सा के चाहिये उतना है. जिसममें जैसेके एकही रू होता है, वैसेही इस कुल हिंदुस्थानपर एक बादशहा हुकूमत करे, ये शहाजादा साहेबकी दिली ख्वायष है. उनकी इन राजपूतोंमे मेहेरबानी तो शिरफ् इतनीही

है, के उनकी लडकीयोंके साथ शादीयां करके सनद ओर फरमान देकर उनको तख्‌तका गुलाम बनाकर रखना. लेकीन आपने मोंगलोंकी लडकी किसी राजपूतके घरपे जानी उनकु बिलकूल मंजुर नही. ओर उदेपूरके राणाके माफक कोई एकभी राजपूत राजा खुद मुखत्यारे रहे ये उनकु गवारा नही.

**गाझी**०—शाबास !

**शहा**०—इसी सबबसे तो ये हुमला उन्होंने इख्त्यार किया है. मानसिंगकी बेहिजती तो एक बहाना है. जैसे आपने वालिद्नें राणाके वालिद्को चितोडसे निकाल दिया, वैसेही इसको मेवाडसे निकाल देना यह उनकी मर्जी है.

**गाझी**०—भला; लेकीन राणानें जो इतने रजपूत जमा किये हैं उनके साथ तो लढाई करना जरूर है ? इसकी तजवीज क्या ?

**शहा**०—उसका क्या फिकर है ? पहेले तो उनकी बराबरीकेही राजपूत कुच आपने मानसिंगके लष्करमें कम नहीं. हिसाबके माफक इनकु आगे करके उनकी आपसमे लढाई होनेकी बाद बाकी जो रहे शिरफ् उनके साथ आपनेकु लढना होगा. मानसिंग राजा इनकी राणानें बेहिजती कियीहै, ओर बेहिजतीका बदला राजपूतकु लेनाही चाहिये. इसवास्ते इस जंगमे उनकी तरफसे

एकबी खता नही होगी. दुसरा इन राजपुतोंको आपने बहादुरीका जो घुमंड रहताहै वोभी इस लढाईमें हमेशाके माफक आपने वास्तेही फायदामंद होगा. आपने लष्करमे तोफ, बंदुक, तुफंग, बारुद, गोला सब चीज तयार है. ये हथियार रजपूतोंके नजदीक नामर्दोंके है, इस सबबसे वो ये रखते नही ओर इनकु देखतेही बेपरवा होकर एकदम टुटकर आगमे बुज जातेहै. सिवाय इसके आपने शहाजादा साहेबने एक औरभी हिमकत निकाली है.

**गाझी०**—वो क्या ?

**शहा०**—आपने लष्करमे राणा प्रतापसिंगके दोनो भाई सागरसिंग ओर शक्तिसिंग हैं ये तुमकु मालूम ही है. राणा ओर उनकी आपसमे बेहितफाकी होनेसे वो आपने बाद-शाहाको आ मिले है. उसमेसे शक्तिसिंग जो बडा बहाद्दर है उसकु आपने पठाण पलटनका शहाजादेने अफसर मुकर्रर किया है. ओर सागरसिंगको चितोडके किल्लेका हाकीम बनाकर भेज दिया है. सबब उसका ये, के राजपूत चितोडगडके किल्लेकु आपना बडा फकर समजते है, ओर अगर कोई मोंगल उसपर हुकूमत करे, तो इन लोगोंको बिलकुल नागवारा गुजरता है. मगर मेवाडके शाही खानदानका एक राजा उसका मालिक बनानेसे राणाकी तरफके औरभी बहोतसे राजपूत उसकु छोडकर वहां जा मिलेंगे. और इस्से उसका जोर

एकबी खता नही होगी. दुसरा इन राजपुतोंको आपने बहादुरीका जो घुमंड रहताहै वोभी इस लढाईमें हमेशाके माफक आपने वास्तेही फायदामंद होगा. आपने लष्करमे तोफ, बंदुक, तुफंग, बारुद, गोला सब चीज तयार है. ये हथियार रजपूतोंके नजदीक नामर्दोंके है, इस सबबसे वो ये रखते नही ओर इनकु देखतेही बेपरवा होकर एकदम टुटकर आगमे बुज जातेहै. सिवाय इसके आपने शहाजादा साहेबने एक औरभी हिमकत निकाली है.

**गाझी०**—वो क्या ?

**शहा०**—आपने लष्करमे राणा प्रतापसिंगके दोनो भाई सागरसिंग ओर शक्तिसिंग हैं ये तुमकु मालूम ही है. राणा ओर उनकी आपसमे बेहितफाकी होनेसे वो आपने बादशाहाको आ मिले है. उसमेसे शक्तिसिंग जो बडा बहाद्दर है उसकु आपने पठाण पलटनका शहाजादेने अफसर मुकर्रर किया है. ओर सागरसिंगको चितोडके किल्लेका हाकीम बनाकर भेज दिया है. सबब उसका ये, के राजपूत चितोडगडके किल्लेकु आपना बडा फकर समजते है, ओर अगर कोई मोंगल उसपर हुकूमत करे, तो इन लोगोंको बिलकुल नागवारा गुजरता है. मगर मेवाडके शाही खानदानका एक राजा उसका मालिक बनानेसे राणाकी तरफके औरभी बहोतसे राजपूत उसकु छोडकर वहां जा मिलेंगे. और इस्से उसका जोर

कम हो जायगा. क्यों गाझीखान ? अब तो राणाके फौजका इतना डर नहीं ? तुम तो गाझी हो ना ?

**गाझी०**—सच्च. लेकीन इन् राजपूतोंकी सुवर जैसी कतलीयोंके सामने हम गाझीबी बिलकूल पाजी हो जाते हैं ! मरना तो उन लोगोंके आगे कुच नहीं. मस्त हाथी तो क्या, मगर चलती तोफपरभी बेशक तूट पडते हैं !

**शहा०**—पडने दो. उन सब काफरोंको कतलकर जहन्नम वासल करें गे. सुनो ये जंगका नकारा बजने लगा (पाहून) ओहो, मैदानमे हमारा लष्कर बिलकूल तयार खडा है. ओ देखो, मानसिंगके राजपूत सबसे पहेले है, और उनके साथ आपने शहाजादा साहेब खुद्द हातीके हौदेपे बेठकर जाते हैं.

**गाझी०**—चलो. ये देखो, इदरसे आपने मोंगल सिपायोंको साथ लेकर राजे मानसिंग आते हैं. इनकू जाकर मिलें. (जातात)

---

(**प्रवेश २ रा**—**स्थळ**, रणमैदान.—**पात्रें**, पुढील पद्य म्हणत कवायतीचे थाटानें मोंगली सैन्य येतें.)

(१ गाणें) **यारों मारो पीटो दवडो ॥ मोडो फोडो झोडो पकडो ॥ छाटो गर्दन् दुष्मन्की ॥ हड्डी तोडो काफरकी ॥ काटो चोटी डालो मट्टी इन सैतानोंके मूमे॥ पीटो डंका दीनका ॥ दर्या वेहो खूनका ॥ मारे गये तो शहीद होंगे जीयो तुम तो गाझी हो ॥ छाटो गर्दन् दुस्मन्० ॥ हड्डी तोडो का० ॥ बहादरीसे बहोत लढेंगे॥**

लाखों काफर कतल करेंगे ॥ बढाएंगे दरजा सबका ॥ नाम करेंगे मालकका ॥ यारों मारो० ॥

( मानसिंग येतो, त्यास सलामी देतात. )

**मानसिंग** ( सलामी घेऊन आपल्याशीं )—या उदेपूरच्या राण्यानं आपल्या पवित्रपणाच्या डौलांत माझा जो अपमान केला आहे, त्याचा सूड घेतल्या वांचून मी कधीं रहाणार नाहीं. रजपूतानं आणि आपल्या अपमानाचा बदला घेतल्यावांचून स्वस्थ राहणं ह्या सारखा नामर्दपणा दुसरा कोणताच नाहीं. आमच्या हातून असं तें काय महत्पातक घडलं आहे कीं, त्यापायीं राण्यानं आमच्या साठीं ह्मणून तयार केलेल्या अन्नाचाच नव्हे, तर तें अन्न घातलेल्या पात्रांचा व तीं पात्रं मांडलेल्या जागेचाही विटाळ मानून आमचा अगदीं उपहास व धिःकार करावा ! आह्मी मोंगलांशीं सोईरिकी करून बादशाही नोकऱ्या इमानानं बजावतों यांत काय आमची गैररीत आहे ? पण राण्याच्या दुराग्रही व फाजील मानी स्वभावाला हें आमचं वागणं अत्यंत नीचपणाचं वाटून तो आमचा असा अपमान करतो काय ? भोग ह्मणावं आतां त्याचीं फळं ! तुझी गुमीं जिरवण्याकरितांच ही मोहीम आहे, समजलास ? (तलवार उपसून) —यार सीपाइयों—अरे पण ही गर्दी कशाची ?

( एक रजपूत शिपाई धांवत येऊन मानसिंगास )

**१ शिपाई**—

(गाणें) हां धांवा धांवा जलदि करा बांचवा शहाजादा ॥

२ शिपाई—

रे थांब ॥ दम खा ॥ नीट सांग ॥ घाबरूं नको ॥

शिपाई—

—हा तो राण्यानें ॥—

( राण्याचा चैतक घोडा हत्तीवर चढला असून हत्तीवरील हौद्यांत घाबरून गेलेल्या शहाजाद्यावर राणा भाला मारीत आहे व तो ढाल तरवारीनें त्याचें निवारण करीत आहे असा देखावा. )

—हा तो राण्यानें, घोडा हत्तीवर, चढवूनी भाला, माराया रोंखीला ॥ शहाजादा याला बांचवो खुदा ॥—

शहाजा०—( मोठ्यानें ओरडून )

—आ ये सैतान, लेगा मेरी जान, मुझे अब कोन, बचावे या, अल्ला ॥ शुके खुदा ! ॥—

प्रताप०—( भाला उगारून आवेशानें )—

—आरड ओरड, किंवा कोठें दड, कर धडपड, प्राण द्यावयाला ॥ आला बघ भाला ॥—

शिपाई—

—शहाजादा याला बांचवो खुदा ॥—

मानसिं० शिपा० सर्व सैन्य—( मिळून एकदम ह्मणत )—

—हां दौडोदौडो जलदि बचाकर लेवे शहाजादा ॥

( सर्व पळत निघून जातात. देखावा बंद. )

---

( प्रवेश ३ रा—स्थळ, तेंच.—पात्रें दोघे भाट. )

चित्रभाष—अहो चंडदासजी,—

( पद ) वीर धारातीर्थी त्यजिती देह झुंजतांना ॥
जाति सुगतिस पुनरपि न घडे जन्ममृत्यु त्यांना ॥

॥ वीर० ॥ क्षत्रियांना मोक्षद आहे हाच मार्ग एक ॥ यांस अनुसरतां त्यां होतो प्राप्त भानुलोक ॥ पुण्य पर्वचि आलें मोठें हा प्रसंग जाणा ॥ वीर० ॥

चंडदास—( पाहून ) अहो पहा पहा, ते आपले वीर शत्रुसैन्यांतील हजारों शिपायांची कत्तल करून त्यांचीं प्रेतं कशीं ऐटीनं तुडवीत चालले आहेत.

चित्रभा०—खरंच.—

( दिंडी ) बघुनि रक्तांकित देह गमे यांचे ॥ मिळे आलिंगन यांस जयश्रीचें ॥ तिच्या तनुची जणुं उटी केशराची ॥ लागुनी ये चित्रता अशी साची ॥

चंडदास—वाहवा, रजपूत वीरांनो, आजचं हें तुमचं अप्रातिम शौर्य स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ ह्या तिन्ही लोकींच्या देवतांना अत्यंत संतुष्ट करीत आहे, पहा—

( श्लोक ) चढुनी रणावेश हें युद्ध घोर ॥ करूनी गतप्राण जे आर्य वीर ॥ तया घालेती माळ त्या दिव्य नारी ॥ पहा हर्षवी युद्ध हें त्यांस भारी ॥ बहू रक्तमांसास्थिच्या कर्दमांत ॥ मिळे लोळण्या ज्यांस ते भूत खेत ॥ पहा नाचती काय किंकाळती ते ॥ अनर्थ क्रियाही तया हर्षवीते ॥ स्वदुष्कर्म भोगावया दुष्ट तुर्कां ॥ वधूनी तुह्मी धाडितां त्यांस नर्का ॥ कृतीनें अशा तेथही काळदूत ॥ किती होति ते आज आनंदचित्त ॥

चित्रभाष—अहाहा ! —

( साकी ) गर्जति ह्या रणभेरि भयंकर धड धड नाद तयांचे ॥ ऐकुनि रणमदयुक्त होतसे मन भितऱ्याहि जनांचें ॥ वीरांना त्वेष ॥ किति तरि चढवी हा घोष ॥

चंडदा०—शाबास वीरांनो शाबास! आजचा हा

तुमचा घोर संग्राम पाहून तें भारती युद्धच प्रत्यक्ष पहाय-
ला मिळालं असं वाटतं.

**चित्रभा०**— खरंच आहे—

( ४ पद ) **अस्मद्रणधीर वीर आर्य नरवरें ॥ दाखविलें युद्ध पुन्हां भारती खरें ॥ अस्म० ॥ शत्रुला न पाठ देति ॥ मरणही न शरणाप्रति ॥ शस्त्र विशस्त्रावरतीं ॥ हे न पहा व्यापारिति ॥ युद्धांतहि धर्म एक यांस हा स्मरे ॥ अस्मद्रणधी० ॥**

—( पाहिलेंसें करून ) पण कायहो, चंडदासजी, हें यवनी सैन्य एकदम अशा आवेशानं चाल करून ह्या बाजूला कां निघालं बरं?

**चंडदास०**— ( पाहून ) बरोबरच आहे तें. तें पाहि-
लंत का, आपल्या महाराणाजींचं भरजरी छत्र त्या ठि-
काणीं दिसतय तें. हा सर्व रोंख त्यावर आहे.
राणाजीनीं आपलं छत्र या संग्रामांत तरी दूर करावं ह्मणून
त्यानां पुष्कळ सांगून पाठविलं; परंतु मृत्यूस केवळ तुच्छ
मानणारा तो महामानी वीर, आपलीं राजचिन्हं इथंहि दूर
ठेवीत नाहीं. त्यामुळं एवढ्या विस्तीर्ण सेनासमुद्रांत
राणाजी कुठं आहेत हें शत्रुसैन्याच्या तेव्हांच लक्षांत
येऊन त्यांचा सर्व मारा त्याच ठिकाणीं होत आहे हा.

**चित्रभा०**—अहो ते पहा, दोन्ही सैन्याचे लोट तेथें
एकावर एक पडून केवढं तुफान रण माजलं आहे!—

( घनाक्षरी ) **सूटतां प्रचंड वात ॥ अभ्रावरि अभ्रपात ॥
दोन्हि दळें तेंवि मिळत ॥ तीं परस्परां ॥ उन्मळोनि**

वृक्ष पडत ॥ स्वार तसे ते अदळत ॥ दळभारें ही कंपित ॥ भूमि होतसे ॥ लख लख शस्त्रें चमकत ॥ वाटे ती जणुं विद्युत् ॥ वीरघोष हा गर्जत ॥ मेघ अंबरीं ॥ धुंद दिसे दिशाप्रांत ॥ रवि तेजहि होय लुप्त ॥ प्रलयकाळ भासवीत ॥ युद्ध घोर हें ॥

**चंडदास**—अहो तें आणखी पहा—

( श्लोक ) सोडीतां अग्नियंत्रें रणधुळितचि हे धूम्रकल्लोळ मोठे ॥ बाणांची वृष्टि होतां उसळुनि निघती त्यांतुनी पक्षि वाटे ॥ वीरांचें खड्ग भाले रिपुहृदय विदारूनि येतां तयांस ॥ पाहूनी काय जाळ्यांतुनि बघति सुटूं मत्स्य हा होत भास ॥

**चित्रभाष**—चला तर मग, आपल्या वीरांच्या आंगीं रणावेश भरून देण्यासाठीं आपण त्या ऐन संग्रामाच्या ठिकाणींच जाऊं.

( पुढील पद्य दोघे मिळून म्हणतात. )

( ५ पद ) चला वीरहो समर करा ॥ शत्रुमुखीं रणधूळ भरा ॥ धैर्य धरा ॥ कीर्ति वरा ॥ स्वदेशधर्मोद्धरण करा ॥ चला० ॥ सुरसेनानी शिवकुमरा ॥ संतत निज अंतरीं स्मरा ॥ आर्यवरा ॥ समरपरा ॥ स्वपूर्वजां संतुष्ट करा ॥ चला० ॥

( जातात. )

---

( प्रवेश ४ था.–स्थळ, रणभूमीपासून कांहीं अंतरावरचें जंगल–पात्रें, जखमी झालेला व सर्वांग रक्तानें भरलेला प्रतापसिंह एकटाच घोड्यावर बसून येतो. )

**प्रताप०**–( घोड्याला थांबवीत )–

( ६ पद ) थांब थांब ॥ हो हो बेटा चैतका तूं थांब

**थांब ॥ नोसि कां असे ॥ दूर तूं मला॥ कुठुनि॥ चुः हो ॥ वेडं हें तुला ॥ पवनगतिस तुच्छ करुन ॥ झुडुपदरडि पार उडुन ॥ ऐन रणांतून गड्या ॥ आणिलेंस हें किती पहारे लांब ॥ थांब० ॥**

—( घोड्यास थापटून ) अरे, तुझ्या मनांत तरी काय आहे? जरा स्वस्थ हो. इतक्या दूर एकीकडे मला घेऊन येण्यांत तुझा हेतु तरी काय बेटा? समजलों; ह्या मला लागलेल्या जखमांची तुला कींव येऊन नेहेमींच्या ममतेनं तूं मला विश्रांतिसाठीं इकडे घेऊन आलास. पण गड्या माझे असंख्य वीर तिथं शत्रूंच्या तोंडावर लोटून एकट्या माझ्या प्राणाची तूं इतकी काळजी अशा प्रसंगीं दाखवायची नव्हतीस. अरे—

( ७ पद ) **वेळ न ही ममतेची ॥ प्रेमा मजवरि दाखविण्याची ॥ वेळ न ही० ॥ रणभूमिवरि न दिसे मी जरि ॥ कशि होइल गत मम वीरांची ॥ आधाराचा स्तंभचि ढळतां ॥ सांग टिकेल इमारत कैंची ॥ वेळ न ही० ॥**

—छे, तुझं आतां ऐकणं योग्य नाहीं. ही पहा मी उडी टाकली. (तसें करतो.) तुझं इमान मी जाणून आहें, आणि त्याचं तूर्त थोडंसंच बक्षिस ह्मणून मीच तुला गड्या कांहीं वेळ इथं मोकळा सोडून देतों. तुलाही ह्या कांहीं जखमा कमी नाहींत. सर्वांग रक्तानं किरे भरलं आहे. ( त्याजवरील खोगीर वगैरे काढीत) जा बेटा. नको असे डोळे फिरवून दीन मुद्रा करूंस. या स्वच्छ ओहोळांतील पाणी पी आणि त्या झाडींत स्वस्थ चर जा—

( घोड्यास सोडतो, पण श्रमातिशयानें तो घोडा लागलाच गतप्राण होऊन पडतो )

—हायरे हाय ! बेटा चैतका,—

( ८ पद ) अस्मद्भूषण तें गणून तुजला प्राणाहुनी चाहिलें ॥ अस्मद्रक्षक तूं खरा मज निज प्राणांतिंही रक्षिलें ॥ अस्मद्बाहुसुत्हद् असीपरि रणीं होसी कधीं दूर न ॥ बेटा ! चैतक ! सर्वथा परि अतां जासी कसा सोडुन ॥ (चाल) ॥ हा हा ! गे दुर्नियते केलिस हानि केवढी पाहीं॥वाजिराज हा नेतां आली यमा दया न तुलाही॥

—अरे तुझ्या सारख्या इमानी मित्राला आतां इथं असाच टाकून माझ्यानं जाववेल तरी कसं ? आणि गड्या मी इथं राहूं तरी कसा ? चैतक, तो पाहिलासना, तो पहा शत्रूकडचा कोणी एक स्वार भरधांव घोडा फेंकीत थेट मजवरच चालून येत आहे. मी काय त्याशीं पायींच लढूं कारे ? उठ. तूं नाहीं का उठत ? अथवा काळाच्या जबरदस्त झडपेंत सांपडलास तूं, आतां कसचा उठतोस ? असो, मला तर त्या वीराचा समाचार घेतलाच पाहिजे. तेव्हां मित्रा, तुझी शेवटची निरवानिरव तूर्त मला एवढीच करतां येते, हिचा स्वीकार कर.—

( दिंडी ) आसवांनीं न्हाणुनी तुला आधीं ॥ और्ध्वदेहिक यांत हें तुझें साधी ॥ कठिण पाषाणच अशा निज मनाचा ॥ समज सांप्रत चौथरा तुला साचा ॥

—( शस्त्र सरसावून स्वाराकडे पहात ) अरे, हा स्वार तर पायउतारा झाला. बैस बैस, वीरा, तूं घोड्यावरच बैस. फार काय, पण हत्तीवर जरी बसून येतास तरी

तिथंही तुझा समाचार घ्यायला हा प्रतापसिंह तयार आहे.

( शक्तिसिंह प्रवेश करतो. )

**शक्तिसिंह**-- तुझ्या पराक्रमा विषयीं माझी खात्री आहेच; पण तूं ज्या अर्थी पायीं आहेस त्या अर्थी मी घोड्यावर असणं नीट नव्हे.

**प्रताप**०—यावरून तूं कोणी रजपूत वीर दिसतोस. त्या खेरीज अशा धर्मयुद्धाच्या कल्पना तुमच्या पक्षाकडे संभवत नाहींत.

**शक्ति**०—तूं मला ओळखलं नाहींस वाटतं.

**प्रताप**०—कोण तूं? शक्तिसिंह काय? अकबराच्या पक्षाला जाऊन मिळालेल्या माझ्या दोघां बंधूंपैकीं, एकवेळ शिकारीच्या वांटणी वरून माझ्याशीं भांडून गेलेला तूं, होय ना?

**शक्ति**०—होय, नावानं तोच मी, पण वृत्तीनं मात्र आतां तो राहिलों नाहीं.

**प्रताप**०— तर मग कोणत्या वृत्तीनं तूं इतक्या दूर माझा पाठलाग करीत आला आहेस ?

**शक्ति**०—पाठलाग नाहीं, पण सख्ख्या बंधूचं नातं स्मरून तुझी पाठ राखायला मात्र हा आलों आहें.

**प्रताप**०—ह्मणजे काय?

**शक्ति**०— प्रतापा, अरे तूं जखमांनीं बेहोष असा घोड्यावर एकटाच चालला आहेस असं पाहून माझ्या टोळींतील खुरासानमुलताना कडील दोन पठाण तुझ्या

मागं लागले होते. त्यावेळीं मला ही तुझी निराश्रय स्थिति पाहून वाईट वाटलं, आणि वैरी असला तरी असा बाणेदार मोहरा यःकश्चित प्याद्याच्या हातीं अशा स्थितींत सांपडला जावा, हें मला योग्य न वाटून मी त्यांना आडवा झालों; पण आनायासं सांपडत असलेली अशी मोठी शिकार सोडून द्यायला ते अर्थातच नाखुष दिसले, तेव्हां त्यांना मी लागलींच कापून टाकलं आणि तुलाही एकदां भेटायला ही संधी बरी आहे असं वाटून मी तसाच तुझ्या मागोमाग हा इकडे आलों. आतां हे वीरबंधो, हातांतलं शस्त्र टाकून मला एकवेळ कडकडून भेट बरं !

( दोघे बंधु प्रेमानें परस्परांस भेटतात. )

**प्रताप०**—शाबास, शक्तिसिंह शाबास ! या तुझ्या अप्रार्थित उपकाराबद्दल मी तुझा उतराई कसा होऊं बाबा ?

**शक्ति०**—माझे पूर्वीचे सर्व अन्याय विसर ह्मणजे झालं. तुला सांगून ठेवतों कीं, ह्यापुढं मी तुझ्या शत्रुपक्षाकडे मुळींच राहणार नाहीं. अकबर बादशहाची अलीकडे कशीही प्रशंसनीय वृत्ति आह्मा रजपुतांचं प्रखर शौर्य व आमच्या आर्यधर्माचं अत्युन्नत स्वरूप अनुभवून झाली असली, तरी असा तो अकबर एकटाच होय. तो यांचा बादशहा असला तरी झाडून साऱ्या या तुर्कांच्या मनांतील हिंदुद्वेष कायमच आहे. आणि त्या द्वेषानं खऱ्या वीरपुरुषाला लांछनास्पद असा वेळीं हवा तो अन्याय करून, ते आमचा निःपात किंवा आह्माला स्वधर्मभ्रष्ट

करून या देशांत आपली सत्ता सर्वत्र कायम करण्याचा मतलब बिलकूल विसरले नाहींत. याच लढाईत मानसिंगाच्या आणि तुझ्या सैन्याचं तुंबळ रण माजलं असतां दोन्ही पक्षांस रजपूतच असल्यामुळं मोंगली शिपायांना आपला गोळीबार चालवून स्वपक्षाच्या रजपुतांचं साह्य करतां येईना. पण त्या वेळीं त्यांना बेलाशक हुकूम मिळाला कीं, एकदम गोळी सुरू करावी. त्या गर्दींत स्वपक्षाचे रजपूत मेले तरी ते काफरच असल्यामुळं त्यांनाही मारून टाकण्याचं पुण्य इस्लामी धर्माप्रमाणं कांहीं कमी मिळणार नाहीं! सारांश, अशा मतलबाच्या एकेक गोष्टी माझ्या प्रत्यक्ष अनुभवाला आल्यामुळं मी लौकरच संधी साधून आतां तुझ्याच पक्षाला येऊन मिळायचा निश्चय केला आहे.—

( पडद्यांत मोठाच गलबला होतो. )

—अरे पण ही गडबड कशाची ? ( पाहून ) प्रतापा, तुझ्या सर्व सैन्याची तिकडे एकाएकीं दाणादाण होऊन तें पहा कसं सैरावैरां चहूंकडे धावूं लागलं आहे.

**प्रताप०**—( आवेशानें )—असं काय? तर हा पहा मी तिकडे निघालों.

**शक्ति०**—( त्यास थांबवून ) बंधु, पण तूं आतां एकटाच असं साहस करूं नकोस. अरेरे, ह्या पहा तुला किती भयंकर जखमा लागल्या आहेत!

**प्रताप०**—( झिडकारून ) अरे या जखमांची मी मुळींच परवा करणार नाहीं. कारण हीं क्षतं नसून त्यांच्या रूपानं हा माझा देहच हीं अनेक दीनमुखं इतरांपुढें पसरून त्यांच्या अंतःकरणांत मजविषयीं अशी ही दया आणि माझ्या अंतःकरणांत या नामर्दपणाची लज्जा उत्पन्न करीत आहे. या करितां अशा या क्षुद्र देहाच्या रणभूमीवर छिंद्ड्याच झाल्या पाहिजेत. ( पुनः गलबला होतो ) छेः, मला नाहीं हें स्वस्थपणानं ऐकून घेववत. मी असाच धांवत जाणार तिकडे. ( जाऊं लागतो. )

**शक्ति०**—(त्यास आंवरून )—छे छे प्रतापा, अशा स्थितींत तूं एकटा पुढं जाऊं नकोस. हा पहा तुला या जखमांमुळं तापही भरत चालला आहे. ऐक. अरे, ( पाहिलेंसें करून ) पण तें कोण? तुझ्याच पक्षाचं कोणी इकडे येत आहेसं वाटतं.

( चित्रभाष खिन्नमुद्रेनें येतो. )

**चित्रभाष०**—कोण ? आमचे महाराज काय? राणाजी, कायहो दुर्धर प्रसंग हा.

**प्रताप०**—( शक्तिसिंहास ) आणि असं असून मला तिकडे जायला प्रतिबंध करतां काय ?

**शक्ति०**—अरे पण तिकडला वृत्तांत तरी यांच्यापासून आधीं सर्व ऐकून घे.

**चित्रभा०**—काय सांगूं हो, राणाजी उभय सैन्यांतील ऐन घनघोर संग्रामांत आपले चंडदासजी आपल्या वीरांना आवेशभरित गीतांनीं उत्तेजन देत असतां एका एकीं गोळी लागून देवलोक पावले!

**प्रता०**—अरेरे, आमच्या तरवारींत सामर्थ्य नाहीं इतकं या भाटांच्या वाणींत सामर्थ्य होतं.

**चित्रभा०**—महाराज, दुसरी वार्ता तर याहूनही दुःखकारक आहे. आपण आपलं राजचिन्ह या ऐन प्रसंगांतही दूर करानात, त्यामुळं शत्रूचा सर्व मारा आपणा एकट्यावरच होऊन मोठा अनर्थ गुजरण्याचा प्रसंग आला होता. पण आपले व्याही झाला शामसिंहजी यांनीं आपलं तें भरजरीछत्र स्वतांच्या डोकीवर घेऊन शत्रूला आपण दुसरीकडे असल्याची हूल दाखवीत ते सैन्यांतून फुटून एकीकडे निघाले. अर्थात त्या हुलीला फसून यवनी सैन्यही त्यांच्या मागं धांवलं. पण याप्रमाणं बरंचसं दूर गेल्यावर मग एखाद्या चवताळलेल्या वाघाप्रमाणं त्या झालावीरानं एकदम उलट घेतली आणि असंख्य शत्रूंची भयंकर कत्तल करीत, त्या आपल्या अपूर्व स्वामिनिष्ठेची ध्वजा सर्वांच्या अंतःकरणांत कायमची उभारून, वीरास उत्तम गति जें शत्रुसंमुख रणांगणीं पतन, त्यास तो ज्वान मोठ्या शौर्यानं अनुसरला!

( त्वेषानें दोघांस झिडकारून जाऊं लागतो. )

**चित्रभाष**---(त्यास थांबवून ) राणाजी, आपण असं साहस करूं नका. आमचं ऐका. आपल्या जिवावर सर्व कांहीं या राष्ट्राचीच नव्हे, तर तूर्त आर्य जातीची व आर्य धर्माची इमारत आहे. त्या इमानी चेतकानं हेंच जाणून आपल्याला इकडे सुरक्षित आणून ठेवून प्राण सोडला असावा. अहो असा आपला बहुमोल जीव आपण अशा अविचारानं धोक्यांत घालूं नका.

**प्रता०**---छे हो, असा अपयशाचा डाग लागल्यावर माझ्या प्राणाची कांहींएक किंमत नाहीं.

**चित्र०**---शिवाय झाला शामसिंहजीच्या चिरंजिवाचंही आपल्याला जाऊन समाधान केलं पाहिजे.

**प्रता०**---तें काय, युद्धांतून मागं फिरून अशा कृष्णमुखानं करूं? कळवा त्याला माझा हा निरोप, कीं---

( साकी ) **वीरोचित गति पिता पावला तूंहि वीरसुत असशी ॥ ठावा क्षत्रिय धर्म तुला तूं सांत्वन योग्यचि नसशी ॥ घेतां अयश तरी ॥ आम्हा तीच गती समरीं ॥**

( जाऊं लागतो. )

**चित्रभा०**---( आडवून ) राणाजी, थोडे तरी थांबा. ह्या जखमा बांधूं द्या. पहा यांत वारा भरून त्या सुजत किंहो चालल्या आहेत.

**शक्ति०**---आणि आतां तर अंगाला हातही लाववत नाहीं इतका ताप भरला आहे.

प्रता० ( झिडकारून )—अहो, या तापाचा दाह प्रलयकाळच्या अग्नी प्रमाणं प्रखर होऊन त्यानं मी जळून गेलों तरी बेहेत्तर; पण माझी रक्षा तरी त्या संग्राम भूमी-वरच पडली पाहिजे. चला सोडा हो. अपयशाचा भार जोंपर्यंत शिरावर आहे, तोंपर्यंत हातामध्यें शस्त्र हें सिद्ध असलंच पाहिजे. जाऊं द्या. ह्या क्षुद्र देहाची कशाला इतकी ही मिजास. चला, आणा तें शस्त्र.

चित्र०—पण राणाजी, आपल्या हाताला लागलेल्या या जबर जखमेमुळं तें तूर्त धरतां येणार नाहीं आपल्याला.

प्रता०—असं काय? ( हातांतला रुमाल फेंकून )—

( ९ पद ) बांधा तर मग तें हाता ॥ योग्य न ही तुमची ममता ॥—( जाऊं लागतो. )

चित्रभाष—( आडवून )—

—हां जरा ॥

प्रता०—( झिडकारून )

—दूर सरा ॥—( दुसरीकडून जाऊं लागतो. )

शक्ति०—

-थांब जरा-

प्रता०—( त्यालाही झिडकारून )—

दूर सरा ॥ क्षणहि न राहिन मी आतां ॥

( त्वेषानें जाऊं लागतो पण घेरी येऊन मूर्छित पडतो. )

चित्रभा०—( गहिंवरून. ) हाय हाय ! महाराज, सावध व्हा सावध व्हा !

**शक्ति०**—हां असे घाबरूं नका. जखमांतून पुष्कळसं रक्त वाहून आलेल्या अशक्ततेमुळं ही यांना घेरी आली आहे. मी ह्मणतों आतां हे अशा स्थितींत आहेत तोंच यांना आपल्या छावणींत घेऊन जा. सावध असल्यावर हे अगदीं वळायचे नाहींत. तुमच्या पाठीवर कोणाला न येऊं देण्याचा बंदोबस्त मी ठेवतों. चला.

( जातात. )

---

(प्रवेश ५ वा–स्थळ, रणमैदान.–पात्रें, मानसिंग व शहाबाझखान. )

**शहाबा०**—इस लढाईमें खुदानें बडी खैर किई!

**मान०**—खरं आहे; नाहींतर आधींच बादशहाचे मर्जीविरुद्ध काढलेल्या या मोहिमेंत शहाजाद्याचं जर कांहीं बरं वाईट होतं, तर मग मोठंच कठीण झालं असतं.

**शहाबा०**—शेर जेसा आपने शिकारपर झपट मारता है, वेसेही ऐन जंगमे राणाने आपने शहाजादापर झडप किई, उस्से बडी मुष्कीलसे शाहजादाकी जान हमने बचाई, ओर उनको गाझीखान साथ देकर अजमीर तरफ भेज दिया.

**मानसिंग**—त्याच वेळीं राण्याची सरशी होऊन आपल्या लष्करानं अगदीं कच खाल्ली होती; परंतु दिल्लीहून बादशहाची स्वारी मोठं सैन्य घेऊन आपल्याला

मदत आली आहे, अशी खोटीच आफवा सैन्यांत उठवितांच मागं पळत चाललेल्या आपल्या शिपायांनीं आवेशानं उलट घेतली. आणि सुदैवानं त्याच वेळीं राणाही कुठं एकाएकीं दिसेनासा झाल्यामुळं, त्याच्या आधींच थकलेल्या सैन्याचा एकदम धीरच तुटला. त्या योगानं शेवटीं या लढाईत आपली फत्ते झाली ! बादशहाची पुण्याई थोर दुसरं काय ? बरं पण खानसाहेब, आतां पुढचा विचार कसा काय करायचा ?

**शहा०**—जेसा शहा जादेका हुकूम आवेगा वेसा किया जावेगा. तोबी मेरा इरादा कोमळमीरके किल्लेकु जाकर घेरनेका है. क्युं के सुनाहे वहा राणाका बालबच्चां है.

**मानसिं०**—आतां लौकरच पावसाळा सुरू होईल, तेव्हां तोंपर्यंत आपल्याला ही मोहीम पुरी केली पाहिजे. राणा कांहीं आपल्याला या एका लढाईनं स्वस्थ राहूं देणार नाहीं.

**शहा०**—अजी राजेसाहेब, अब राणाके जिकर किसवास्ते ? एसा मालुम हुवा है के राणा जखमी होकर भाग गया, और उसके पीछे दो पठाण सवार और शक्तिसिंग उसकु पकडनेको गये हैं. वे पकडकर लायेंगे नहीं तो मारकर. ( पाहून ) ये देखो, ये शक्तिसिंहजी आते हैं. ( शक्तिसिंह येतो. ) अजीसाहेब, आप राणाके तअकबमें गये ये खबर हमकु मिलीथी. देखिये आप

क्या खुशखबरी सुनाते हो. जरूर बादशहाके द्धाच्या आपकी बहोतही तारीफ होगी. क्यों, राणाका नामभी फिर न सुनाई पडे, एसा तो आपने कियाही होगा ?

**शक्ति०**—थांबा थांबा. अगदीं इतके खुशालूं नका. अहो, आपण कल्पना करीत आहां त्या प्रमाणं जरी कांहीं प्रकार होता, तरी सुद्धां या लढाईंत राण्याचा व स्वामिनिष्ठ वीरांचा जो काय अपूर्व शौर्यप्रभाव दिसून आला, त्या योगानं त्याचं नांव यावच्चंद्रदिवाकरौ पृथ्वीवर राहील, असं झालं आहे, समजलांत.

**शहा०**—( उपहासानें ) तो फिर एसा समजना चाहिये के राणाके हातसे मार खाकर तुम खुदही केसेभी जान लेकर भाग आए!

**शक्ति०**—तसंही होतं तरी त्यांत कांहीं आमची विशेष नामुष्कि नाहीं. राण्याच्या तरवारीचं तिखट पाणी खुद्द शहाजाद्यापासून तों आपणा पर्यंत सर्वांना थोडंबहुत चाखायला मिळालेलं आहेच !

**शहा०**—(तिरस्कारानें)जाने दो. समजलीया, के बादशहाकी नोकरी आप इनामदारीसे नहीं करते हो.

**शक्ति०**—( रागानें ) रजपूत? आणि बे इमानी ? ( तरवार उपसून ) खानसाहेब, पुनः जर असे शब्द उच्चारलेत तर आपल्या जिभेचे तुकडे करून टाकीन !

**मानसिं०**—( त्यास आंवरून ) शक्तिसिंहजी, हां

...य ? ( शहाबाजखानास ) खानसाहेब, तुह्मी तूर्त आपल्या तंबूंत चला कसे. लढाईच्या मैदानावर ही आपसांतच कटकट चांगली नव्हे. ( खान जातो. ) शक्तिसिंह, बादशाही नोकरीला असा तापटपणा उपयोगी नाहीं.

शक्ति०—(तरवार फेंकून) आह्मालाहि बादशहाच्या नोकरीची ह्यापुढं गरज नाहीं. आह्मी बेइमानी काय ? अहो यांची चाकरी धरून यांच्या कल्याणा करितां आह्मी आपल्या हातानं आपल्याच देशबंधूंच्या मानाही चराचर कापायला तयार झालों तरी आह्मीच बेइमानी आं! अथवा बरोबर आहे. यांच्याशीं नसलों तरी आमच्या देशबंधूंशीं तरी आह्मी बेइमानीच कीं नाहीं ? बस्स, ह्या दुष्टानं मला लावलेला दोष हेंच त्या बेमानगिरीचं प्रायश्चित्त समजून, आतां ह्यापुढं तरी (पुनः तरवार उचलून) हें शस्त्र आपल्याच देशाचं रक्षण करण्याच्या कामीं चालेल, हाच माझा निश्चय होय.

मानसिं०—अहो शक्तिसिंह, राणा बेहोष स्थितींत एकटा आपल्याला सांपडला असतां, आपण निदान त्याला कैदही करून आणलं नाहीं, तेव्हां शहाबाजखान यांनीं आपल्याला जो स्वाभाविकपणें दोष दिला, त्याबद्दल आपण इतकं रागवावं हें बरं नाहीं.

शक्ति०—अहो या मतलबी राक्षसांच्या संगतीनं आपणही धर्मबुद्ध विसरलांत तसा मी विसरलों नाहीं. मानसिंग

आपण तरी निदान असं ह्मणायचं नव्हतं. अहो, युद्धाच्या पूर्व दिवशीं तुह्मी अगदीं थोड्याच लोकांनिशीं रणमैदानची पाहणी करीत असतां, राण्याच्या स्वारांनीं तुह्मांला एकाएकीं घेरलं होतं; पण तो युद्धाचा प्रसंग नाहीं व आपणही बेसावध आहांत, अर्थात अशा स्थितींत आपल्याला उपद्रव करणं गैर, जाणून, राण्याच्याच उदार बुद्धीनं तुह्मी त्यावेळीं धडपणं परत छावणींत आलांत ना?

**मानसिं०**—होय खरं आहे.

**शक्ति०**—अहो तुमच्या रजपूत शिपायांची दुर्दशा उडविण्याच्या कामीं ह्या पाजी हरामखोरांनीं केलेला प्रकार तुह्मी ऐकलात तर, मग दुसऱ्याला बेइमानी ह्मणण्याची यांची काय योग्यता आहे हें तुमच्याही ध्यानांत येऊन, मजप्रमाणंच तुह्मीही यांच्या विषयीं तिरस्कारच मनांत आणाल.

**मानसिं०**—काय? माझ्या शिपायांची दुर्दशा यांनीं केली.

**शक्ति०**—आणि केली यांत नवल कशाचं? आह्मा रजपुतांशीं बादशहाचं सरळ व समदृष्टीचं वर्तन कितीही शुद्ध अंतःकरणापासून असलं, तरी तुह्मी आह्मी सर्व मोंगलां विषयींही तोच भाव मनांत ठेवून, राणाजी सारख्या आपल्याच तेजस्वी लोकांशीं वैर बाळगतों, हें खरोखर चांगलं नव्हे. या योगानं, आपणच आपलेपणाच्या नाशाला कारण होऊन जन्मोजन्म या तुर्कांचे दास होऊन राहूं,

अशी माझी मनोदेवता मला आतां पूर्ण खात्री देत आहे.

( एक जासूद मुजरा करून मानसिंगास पत्र देतो. )

**मानसिंग** ( पत्र पाहून )—हें पहा, शहाजादे आह्माला काय हुकूम पाठवितात. ते लिहितात, तुह्मी आतां ताबडतोब उदेपुरावर जाऊन आमच्या रिवाजाप्रमाणें आमच्या शिपायांना तें शहर लुटूं द्यावं. यांत बिलकूल कसूर होतां कामा नये.

**शक्ति०**—तर मग आपण या हुकुमाप्रमाणं उदेपुरावर जाऊन आपलींच देवळं व पवित्र स्थानं भ्रष्ट व उध्वस्त करण्याचं आतां महापुण्य संपादन करणार; होय ना ?

**मानसि०**—ह्या तुर्कांविषयीं प्रत्यक्ष अनुभवाच्या आपण सांगतां त्या गोष्टी ऐकून आणि ह्या तऱ्हेचा हा हुकूमहि पाहून, मला पण आतां ह्या गोष्टीचा थोडा विचार केला पाहिजे असं वाटतं. चला, तुह्मी आमच्या बरोबर क्षणभर आमच्या छावणींत चला. मग पाहूं.

( जातात. )

---

# अंक चवथा.

( **प्रवेश १ ला—स्थळ,** कोमळमीरचा किल्ला.—**पात्रें,** मुसलमानी पुरुषाचा वेष केलेली रामकुंवर व तिची दासी चंपा. )

**चंपा**—( रामकुंवरच्या मागून कांहीं वेळ चालत चालतां मधेंच थांबून.)—बस्स, मी आणखी एक पाऊल सुद्धां

पुढं येणार नाहीं. बोल, तूं कोण आहेस, आणि आमच्या कुंवरबाईच्या इतका अगदीं महालापाशीं कसा आलास ?

**रामकुं०**—लेकिन् मै कोन हूं अगर ये किसीकूं न मालूम पडने देना होय तो ?

**चंपा**—मग तुला आपल्या जिवाची आशा सोडावी लागेल. आह्मी जरी अंतःपुरांतील स्त्रिया आहोंत तरी आमच्यापाशीं ( कट्यार दाखवून ) हें काय असतं पाहि-लंस ना? प्रसंग पडला असतां यानं दुसऱ्याचा, किंवा निरु-पाय झाला असतां स्वतांचा, प्राणनाश करतां यावा असं आमच्या रक्षणाचं हें आह्मी बिनतोड साधनं जवळ ठेवीत असतों, समजलास ?

**रामकुंव०**—तो मै कोन हूं ये तुझकु कहेना ही चाहिये?

**चंपा**—अलबत, तरच इथून जिवंत सुटशील.

**रामकुं०**—बगेर कहेने तो तूं मुझे पछानती नहीं ?

**चंपा**—ह्मणजे ?

**रामकुं०**—अग अग, चंपे ?

**चंपा**—कोण ? आमच्या रामकुंवरबाईच का ? हा मे-ल्यांनो, तुह्मीं का ह्या ? अगदींच कींहो ओळखूं आलां नाहींत. पण इश्श गडे, हा मेला हिडिस वेष कां?

**रामकुं०**—कसाका असेना, पण ह्यावेळीं तो माझ्या चांगला उपयोगीं पडेल, ह्यांत संशय नाहीं. तूं इतकी माझ्या नेहमींच्या संवयीची असतां तुला दिखील मी ह्या

वेषानं ओळखूं आल्यें नाहीं. मग त्या मोंगलांच्या छावणींत मला निर्भयपणें फिरायला हा किती तरी उपयोगीं पडेल बरं ?

चंपा—अगबाई, आपण किल्ल्याच्या का बाहेर पडणार ?

राजकुं०—होय, या चोर रस्त्यानं बाहेर पडून आज कित्येक दिवस या किल्ल्याला वेढा देऊन बसलेल्या शहाबाझखानाचे छावणींत जाणार, आणि महाराजांकडील कांहीं खबर लागल्यास घेऊन येणार. हा वेढा इथं पडण्यापूर्वी महाराजांच्या मदतीला इकडचं जाणं झाल्यापासून कांहीं एक बाहेरची बातमी कळती नाहीं, त्यामुळं मनाला कशी हुरहुर लागली आहे, आणि उगीच बसून तर, मेलं मुळींच चैन पडत नाहीं.

चंपा—पण मी ह्मणत्यें, इतकं साहस आपण तें काय ह्मणून करावं ?

राम०—अंः, त्यांत काय आहे ? आह्मी कोण आहों.—

( १ गर्भां ) रजपूतांच्या स्त्रिया ह्मणवितों वीरपत्नि आह्मी ॥ अशा या रणप्रसंगांत ॥ साहस आह्माला युक्त ॥ सोडुनि हें कर्तव्य कसें ग स्वस्थ बसूं धार्मी ॥ टाकुनी भीरुपणा दूर ॥ नाजुकताहि दूर ठेवूं ॥ घेऊं युद्धांतहि कार्मी ॥ रजपूतांच्या स्त्रि० ॥

चंपा०—तेंही खरंच. आपल्या या साहसकर्माला जरी मला रुकार देववत नाहीं, तरी आपलं कर्तव्य आपण

बजावूं नका, असंहि कांहीं मला ह्मणवत नाहीं. तरी पण संभाळा गडे. बळं वाघाच्या जाळींत शिरावं, असं आपण हें करतां आहां.

**राम०**— उं:, त्याची नको तुला काळजी. पण काय ग, आईसाहेब ह्यावेळीं काय करीत असतील बरं?

**चंपा०**—त्या बहुधां पुराण ऐकत बसल्या असतील. व्यासजी मघांच त्यांच्या महाला कडे गेले.

**रामकुं०**—बरं तर पुराण संपून त्या उठताहेत इतक्या वेळांतच मी परत येत्यें. तों पर्यंत मी नसल्याचा बोभाटा होऊं देऊं नकोस. जा कशी. ( दासी जाते. ) या साहसाचा परिणाम माझ्या मनासारखा व्हायाला आतां आधीं मला जगदंबेची प्रार्थना केली पाहिजे.—

( २ गर्भा ) **कुलदेवी हे मायभवानी ॥ आमुच्या या सूर्यकुलाची ॥ असशी देवी तूं अभिमानी ॥ कुल० ॥ स्वकुलोचित साहस हें करित्यें तुझ्या कृपेवरतीं विश्वासुनि ॥**

( जाते )

---

[ **प्रवेश २ रा.—स्थळ**, राणीचा महाल—**पात्रें**, राणी, अमरसिंह ( लालजी, ) दासी, वगैरे बसलीं असून व्यासजी पुराण सांगत आहेत असा देखावा.]

**व्यासजी**—( पुराण संपल्यावर अमरसिंहास ) ऐकलंतना लालजी, वीर अभिमन्यूनं आपल्या बापाच्या पाठीमागं कसा पराक्रम केला तो?

**अमर०**—मग, मी सुद्धां असाच करीन. मलाही युद्ध-विद्या आतां पुष्कळ येऊं लागली आहे.

**राणी०**— होयकां बाळा? काय काय शिकला आहेस सांग पाहूं.

**अमर०**—सांगूं? हें बघ, आई—

( ३ गाणे ) **बोथाटी फिरवाया शिकलों पट्टाही तो खे-ळाया ॥ बाणानें मज नेम अचुक तो पहा येतसे माराया ॥ घोडा मी भरधांव फेंकतों हरिणा मागें बसुनि वरी ॥ बरोबरीचे संवगडि मिळवुनि त्यांच्या संगें कुस्ति करी ॥**

**व्यासजी**—( एकीकडे ) क्षत्रियांचीं मुलं अशाच शिक्षेंत वाढावयाचीं. त्यांना बाळकडूंच असतं हें—

( कामदा ) **ढाल ती तया पाळणा असे ॥ खड्गबाण हा खेळ होतसे ॥ शत्रुवध तसें देशरक्षण ॥ क्षात्र-बालका हेंचिं शिक्षण ॥**

**राणी**—बाळा, मग कांहीं वाईट बरा प्रसंग इथं आल्यास आमचं रक्षण तूं करशील तर?

**अमर०**—हो हो, खचित करीन—

( ४ पंद ) **दावुनी भुजप्रताप शत्रुला रणीं ॥ धन्य मातपिता प्रताप करिन या जनीं ॥ धेनुविप्रतापशमन व्हावया करीं ॥ हा पहा प्रतापपुत्र शस्त्र हें धरी ॥**

**राणी**—आणि भिऊन रणांतून परत आलास तर?

**अमर०**—मग व्यासजीनीं परवां विदुलेची कथा सांगि-तली, तींत त्या विदुलेनं जशी रणांतून पळून आलेल्या आ पल्या पुत्राची निर्भर्त्सना केली आहे, त्याप्रमाणंच तूं माझी

कर. कायहो, व्यासजी, काय ती विदुला आपल्या पुत्रास म्हणाली, सांगा बरं ?

व्यास०—ऐकावं लालजी, ती विदुला म्हणाली,—

( साकी ) षंढा क्लीबा समरविमुख तूं घेउनि येशि अपेश ॥ जन्मूनी कां मग मज दिधले गर्भाचे त्वां क्लेश ॥ वीरस्त्री मी ही ॥ व्हावी ताशिच वीरसूही ॥

अमर०—( आईस) हां, आई असंच तूं मलाही म्हणून, मग माझं तोंड सुद्धां पाहूं नकोस !

राणी—( त्याचें चुंबन घेऊन ) शाबास शाबास, खरंच माझा गडे लाल आहे (दासीस) अग, आज याची किनई दृष्ट काढा आं.

अमर०—पण आई, आपण ह्या किल्यावर असंच आतां कुचंबत किती दिवस राह्याचं गं ?

राणी—तर काय करावं म्हणतोस तूं ?

अमर०—काय करावं ? अग—

( श्लोक ) उघडुनि दरवाजे शिंग फुंका रणाचें ॥ तुटुनि पडु चला घ्या नांव कीं ईश्वराचें ॥ लहु कुश अभिमन्यू बब्रुवाहान यांहीं ॥ सुयश मिळविलें तें कां न लाभे मलाही ॥

राणी०—बाळा, हीं तुझीं उमेदीचीं भाषणं ऐकून मला कितीतरी समाधान वाटतं. खरोखर या तुझ्या वीर-श्रीस अनुकूल असं तुझं वय असतं, म्हणजे इथं ते नसतां पडलेला हा वेढा उठवायला, तूं म्हणतोस असंच कांहीं करावं लागतं.

**अमर०**—आणि मी लहान असलों ह्मणून काय झालं? विजोबांच्या वेळीं चितोरच्या लढाईंत माझ्या एवढ्याच आपल्या लहान मुलाचे हातांत भाला देऊन, एक वीरस्त्री शत्रुसैन्यावर चालून गेली, असं तूंच एकादां मला सांगत होतीस ना?

**व्यासजी०**—चितोरच्या शेवटच्या गर्दीत वीर साळुंब्राजी पडल्यावर त्यांच्या स्त्रीनं आपल्या लहान पुत्रासह जो पराक्रम केला, त्या संबंधानं लालजी हे बोलताहेत वाटतं. खरंच बाईसाहेब, काय त्या स्त्रीचा त्यावेळचा तो रणावेश!—

( ५ पद ) ऐकुनि नाथ रणीं मृत ती सति आंवरून निज दुःख धरी ॥ एकुलता सुत घेइ बरोबर देउनि शस्त्र तयास करीं ॥ होय स्वताहि सशस्त्र शिरे मग धीटपणें सहपुत्र रणीं ॥ मारि असंख्य अरी करि कीर्तिस होउनि सादर ती मरणीं ॥

—अथवा रजपूत कुलांतली स्त्री ती. तिनं आपल्या संप्रदायाला योग्य तेंच केलं. पहा—

( साकी ) जिथें स्वपति मृत ती रणभूमिच चिता मानुनी तीतें ॥ पेटविलें त्या सतिनें घालुनि शत्रुरूप इंधन तें ॥ सहगमनचि खचित ॥ केलें स्वकुलातें उचित ॥

—वाहवा खरी शूरविक्रमा स्त्री ती!

**राणी०**—तर काय, लालजी, मीही ह्या प्रसंगीं असाच कांहीं पराक्रम करायला तयार व्हावं असं तूं ह्मणतोस? ठीक आहे. पण तूं मात्र धीर धरून बरोबर

येशीलना ? नाहींतर घरीं बायकांमध्यें पुष्कळ बडबड करून, मग कौरवसैन्य पहातांच उत्तराची कशी गडबड झाली हें माहीत आहेना ?

**अम०**—पण मी कांहीं तसा भिणार नाहीं, समज-लीस. हा पहा मी तयार झालों—( दिवाणजी येतात त्यांस पाहून ) दिवाणजी, उघडाहो किल्ल्याचे दरवाजे. हं आई—

( बंजारा ) **चल जाऊं ॥ चल जाऊं समर कराया ॥ जय किंवा कीर्ति वराया ॥ शत्रुचा करूं निःपात ॥ कीं ठेवूं देह रणांत ॥ स्वकुलीं हें व्रत विख्यात ॥ गोब्राह्मण परि पाळाया ॥ तरवार करीं धरतों या ॥ च० ॥**

**व्यासजी**—( आपल्याशीं ) —अहाहा ! यांची ही वीरश्री यांच्या कुलाला अनुरूपच आहे. ( दिवाणजीस ) पण कायहो दिवाणजी, शेवटीं इतक्या का निकरावर हा प्रसंग येणार ?

**दिवाणजी**—' येणार ' कशाला, आलाच आहे असं म्हटलं पाहिजे. अहो. राणाजींच्या मदतीसाठीं रत्नसिंह महाराजांबरोबर जरी इथलं बरंच सैन्य गेलं आहे, तरी चितोरच्या खालोखाल हा किल्ला मूळचाच फार मजबूत असल्यामुळं ह्या पडलेल्या वेढ्याला आपण आणखी कित्येक महिने दाद दिली नसती ! पण तो निमकहराम देवऱ्याचा ठाकुर, शहाबाझखानाकडे फितुर होऊन त्यानं पहा या किल्ल्यावरील पाण्याचा पुरवठा कांहीं

विषारी पदार्थ कालवून पार नासून टाकला; आतां या ठिकाणीं एकही दिवस निभाव लागणं कठीण आहे !

**राणी**०—मग तर आमच्या लालजीनं सुचविला तोच विचार आतां केला पाहिजे असं दिसतं. मग मी ह्मणत्यें, उशीर कशाला? (दासीस) चल, आणाग मला लढाईचा पोषाख.

(शिपाई येऊन मुजरा करतो.)

**शिपाई**—सरकार, बुरुजा खालच्या चोर वाटेनं कोणी एक भिल्ल एकाएकीं किल्ल्यांत आला, त्याला पकडून चौकीवर ठेवला आहे.

**दिवा**०—हां? चल पाहूं दे कोण आहे तो? (दोघे जातात.)

**राणी**—(व्यासजीस)—हा काय बाई आणखी मेला त्या फितुरीचाच कांहीं प्रकार नाहीं ना?

**व्यासजी**—तसं कांहीं नसावं असं वाटतं. कारण हीं भिल्ल मंडळी कांहीं तशांतली नसते.—

(दिंडी) दिसति अज्ञानी जरी माणसें हीं ॥ असति भावी परि भोळी इमानी हीं ॥ स्पर्श यांना सहसा न दुर्गुणांचाः॥ असे सरळच वर्तनक्रम तयांचा ॥

—तथापि आतां आह्मीच शहाणी माणसं त्यांना घालून देत असलेला असा बेमानपणाचा धडा पाहून मात्र ते या सूर्यचंद्रवंशाशीं आपलं पूर्वापार इमान सोडण्याचं मनांत आणूं लागले असल्यास नकळे !

( दिवाणजी येतात. )

**दिवाण**—बाई साहेब, पूर्वीं एकवेळ आमच्या लाल-जीनीं मेहेरबानी करून ज्याला सोडून दिलं होतं तोच हा भिल्ल आला आहे.

**अमर०**—खरंच आई, त्यावेळीं तो ह्मणाला होता कीं, मी हे तुमचे उपकार कधीं विसरणार नाहीं. नाहीं बरं दिवाणजी?

**दिवा०**—होय आणि त्या उपकाराचीच फेड व्हावी ह्मणून तो आपल्याला गुप्त वाटेनं इथून महाराजांकडे घेऊन जाण्याकरितां आपल्या पांच पंचवीस सोबत्यांसह इकडे आला आहे.

**राणी**—खरं कीं काय, तिकडली स्वारी कुणीकडं आहे बरं?

**दिवा०**— अरवली पर्वताकडे आहे असं त्याला कळलं आहे.

**व्यास०**—ह्मणजे? खुद्द महाराजांकडून तो आला नाहीं वाटतं?

**दिवा०**—नाहीं त्याला कुमार रत्नसिंहजीनीं इकडे पाठिवलं आहे. त्यांची स्वारी आसपासच्या रानांतील भिल्ल मंडळी गोळा करीत या किल्ल्यापासून जवळच फिरत असतां त्यांना इथला फितुरीचा प्रकार कळल्या वरून त्यांची ही योजना आहे. असो, मला वाटतं आतां आपण

इथून निघण्याला अगदीं उशीर करूं नये आपल्याला पानपाचोळ्याखालीं पाट्यांमध्यें झांकून घेऊन चांगला आंधार पडतांच इथून निघण्याचं ठरलं आहे. चंद्रोदय होण्या पूर्वींच छावणीपार झालों ह्मणजे बरं.

**राणी०**—पण त्या भिल्लाविषयीं आपली चांगली खात्री आहेना ?

**दिवा०**—या लोकांच्या इमानीपणाबद्दल संशय घेण्याचं कारण नाहीं. बाप्पारावळापासून अनेक महाराण्यांच्या संकटकाळीं इमानानं आजपर्यंत हेच लोक कैक वेळां असे उपयोगीं पडले आहेत.

**व्यासजी०**—आणि त्यामुळंच तर प्रत्येक राजपुरुष जेव्हां या मेवाडच्या गादीवर बसतो, त्यावेळीं आपली करांगुळी कापून तिच्या रक्ताचा टिळा त्या राजपुरुषाचे कपाळीं लावण्याचा मान या लोकांना आहे तो.

**राणी०**—बरं तर चला, ही मी तयार आहें. कोणी तरी रामकुंवरच्या महालाकडे पाठवून तिला घेऊन या.

**दिवा०**—आपण चलावं. मी ती सर्व व्यवस्था करतों.

(जातात)

---

(**प्रवेश ३ रा—स्थळ**, शहाबाजखानाची छावणी.—**पात्रें** तंबू बाहेर शहाबाजखान, रणमस्तखान, फरीदखान असे सरदार मजेनें निशापाणी करीत बसले असून पुढें नाचगाणें चालले आहे असा देखावा.)

( कांहीं वेळ नाचगाणें झाल्यावर. )

शहा०—वाहवा वाहवा ! क्या अजब राग बोला. सुनकर दिल बहोत खुष हो गया है !

रण०—नाचना तो क्या अजब है जैसी बिजली चमक रही है !

फरी०—रंग तो क्या खूपसूरत जैसी बहिश्तकी परी है.

सरदार—मुजरेका दिखावभी ऐसा के दिल बाघ बाघ हो जाता है !

श०—क्या, इन् काफरोंके पासभी ऐसीं अजब चीजें रहती हैं !

रण०—उनके पास रही तो हमारेही काम आती है.

( पाठीमागें पहाडाचा देखावा. त्यांत डोकीवर पाट्या घेऊन कांहीं भिल्ल चाललेले दिसतात. )

फरी० ( पाहून )—देखो देखो खांसाब, चांदनीमें ऐसा मुजकु मालुम होता है के उस पहाडीपर द्रख्तके नीचे कुछ आदमी जा रहे हैं.

शहा०—( दुर्लक्ष करून ) जाने दो. कैसे शादी-बदखबरे हो. कोई जंगलमें रहनेवाले घांसचारा एखठा करके ले जाते होंगे. यहां क्या लुत्फ हो रहा है, और इन् नाजुक मुखडोंको छोडके क्या इधर उधर देखते हो. ( त्यास एक दारूचा पेला देण्यासाठीं पुढें करून ) ए शराबका जांब लीजिए.

फ़री०—नहीं नहीं. आप लें, या ( रणमस्तखानास ) उनकु दीजिए.

श०—नहीं पहेले आपही मेरा सवाल पुरा कीजिए.

फ़री०—नही साहेब, पहेले आप पीछे हम.

श०—आपही लीजिए के ध्यान दुसरी तरफ न जाए.

फ़री०—( घेऊन ) मुजकू पहेलेसेही बहोत नशा हो गया है. ओर जबसे आपने बादशहाने शराबका पीना बंद किया तबसे ये आदत छूटती जाती है.

श०—हमारे बादशहा तो क्या ? शराबकी बंदिष, कबाबकी बंदिष, नाचगानेकी बंदिष, हर एककी बंदिष करके आपने माफक हम सब अमीर उमरावकोभी पीरे मुर्घा बनाने चाहते हैं. इसी वजासे तो मै दिल्लीसे निकलनेका मोका देखता था. अब जब ये किल्ला हाथमे आ जायगा, तो चंदरोज यहांही ऐशोआशरत करेंगे. वो भमोडा ठाकुर सब जशनका सामान अबीकी माफक हमेशा पोंचता रहेगा. ( नाचणारणींस ) अच्छा, कोई और चीज सुनाओ !

( पुनः नाचगाणें सुरू होतें, इतक्यांत एक शिपाई " खां साहेब, अजी खां साहेब " असें ओरडत येतो. )

शहा०—( शिपायास )—ये क्या गडबड है ?

रण०—( शिपायास ) क्या, इस्सेभी उमदा शराब तुमारे ठाकुरजीनें भेजी हे ?

**शिपा०**—अजी शराब तो नही एक खराब खबर है.

**सर्वजण** ( घाबरून )—क्या, क्या ?

**शिपा०**—ठाकुर साहेबनें ये पेघाम भेजा है के, बगेर बरूदगोला खरज करनेके किल्ला तो आपने हाथमे आ गया है—

**शहा०**—( मधेंच ) फिर गव्हांर, ये क्या खराब बात हुई ? अलहुमदुल्लील्ला, शुक्र खुदा ! ये बडी खुष खबरी है. अब तो औरबी जादा ऐशो आशरत करेंगे. लाव एक दूसरा शराबका प्याला लाव.

**शिपा०**—अजी खांसाहेब, पहेले सब सुन तो लो. किला तो हाथमें आगया, लेकीन अंदरके शिकार हाथसे निकल गया है. राणाके रिशतेदार बालबच्चा और औरत कोनजाने, कब किदर और केसे गुम हो गये ! जाकर देखा, तो अंदर कोई नहीं. किल्ला एक खाली पडा है !

**शहा०**—ऐसा कैसा होगा ? जब राणाके सब आदमी गए तो खाली किल्ला लेना क्या बहादरी है ? नहीं उस बेमान ठाकुरकी ये दगाबाजी होगी. अब ये गाना बिजाना खानापिना सब बंद करके जलद लाव पकडकर उसकु यहां.

**रण०**—देखो ये तो आगये !

( ठाकुर येऊन मुजरा करतो. )

**शहा०**—क्यों ठाकुर साहेब, किल्लाके पानीमें जेहेर मिलानेसे उसके सब आदमी आपने हाथमे आनेकी जो

तजबीज तुमने किईथी उसकी हमने बहोत सफारश बाद-शहाकु लिखी है. लेकीन अब ये क्या दगाबाजी ! शिरफ् खाली किल्ला हमारे सपूर्द करते हो ? बोलो, राणाके आद. मीओंको किदर भगा दिया ? सच्च कहो नही तो इसकी तुमको सखूत सजा मिलेगी.

ठाकुर०—( आश्चर्यानें )—आं ! काय ह्मणतां ? किल्ल्यावरील माणसं मी पळविलीं ? अशी दगलबाजी मी करीन कशी ?

शहा०—अलबत, जो तुम आपने भाईयोंसेभी दगा करके हमारे साथ आमिले, तो हमसे ऐसा क्यों नही करोगे? बस्स इस काफरको एकदम कैद करों.

फरी०—खांसाहेब बराबर फरमाया.

१ सर०—इसके बदले ये सखूत सजा पायगा.

ठाकुर०—( आपल्याशीं )—अरे रे, हेंच का अखेरीस इतक्या खटपटीचं चीज ! स्वजनाशीं द्रोह केल्याबद्दल ति-कडे आपल्या लोकांत मला तोंड राहिलं नाहीं, आणि यांनींहि आतां राण्याचीं माणसं पळविल्याचा गुन्हा बळं माझ्याच आंगीं लावून इकडेहि तें बंद केलें ! वा ! बेइ-मानी, फितुरी, हरामखोरी यांचं शेवटीं बक्षिसच हें असतं. नशीब !

शहा०—सरदारों. चलो, राणाके आदमी आपने हातसे निकल गये इसे हमारी बडी बदनामी है. फरीदखां, तुम

पांचसो उमदा तयार सवार लेके एकदम दौडो ओर चाऱ्होंतरफ तलाश करो. जो आदमी द्रख्तके नीचे पेहले नजर आएथे, मालुम होता है के शाहिद वोही राणाके आदमी होंगे. जाओ, बहोत जल्द तयारी करो. रणमस्तखां चलो तुम हम किल्ला ... पने कबजेमें करें.

(... जातात.)

---

( प्रवेश ४ था.—स्थळ, एक अरण्य.-पात्रें, मुसलमानी वेषानें रामकुंवर आपल्याशींच विचार करीत येते. )

रामकुं०——... ...हस केवढं तरी होतं हें; अहो——

(६ पद) स्त्री जरी असे मी परी पहा हा धरी वेष पुरुषाचा ॥ त्यांत ही असे तो किती भिन्न जातीचा ॥ अंतरीं वृत्ति जी खरी नव्हे तिजपरी रूप जें त्याचें ॥ आणिलें सों... ढोंग, मूळ फजितीचें ॥

—पण ...भावलयं ! त्या मूर्खांच्या गाफीलपणानं त्यांच्या छावणींत खुशाल फिरून मला सर्व कांहीं वर्तमान समजून घेतां आलं. काय मेले, कोमळमीर सारखा किल्ला सर करायला आले, पण हुषार किती ! आपल्या निशेंत व मिजाशींत चूर ! यांच्या देवाघ्यानं तरी तो किल्ला यांस मिळता काय ? पण आतां ती फुशारकी कशाला ? कसा कां होईना, पण मिळालाच कीं नाहीं शेवटीं तो यांना. तूर्त यांचं सुदैव असंच आहे !—

(अं. गीत.) मिळविति यश हें जेंव्हां कांहीं ॥ न मिळे

यांना तें स्वगुणांहीं ॥ परि दुर्गुण आम्हुचेच बाई ॥ कार्य करिति यांचें ॥

—असो, आतां किल्ल्यावर जाण्याची तर सोयच नाहीं. तेव्हां छावणींत कळलं आहे त्याप्रमाणं या अरण्यांत प्राणनाथांचा शोध करून त्यांना जाऊन मिळालं पाहिजे. ( इकडे तिकडे फिरून ) एक प्रकारं ह्या साहसापासून मला केवढातरी लाभ होत आहे हा. जगदंबेनंच मला ही त्यावेळीं किल्ल्याबाहेर पडण्याची बुद्धि दिली असं ह्मटलं पाहिजे. प्राणनाथांची व माझी पुन: गांठ पडून त्यांचं पूर्ण प्रेम आपल्यावर बसवून घेण्याचे अनेक प्रसंग मला आतां सहज साधतां येतील. खचित आतां त्यांची गांठ पडल्यावर मी ह्या पुरुषवेषानंच कांहीं दिवस त्यांचेपाशीं राहीन, आणि योग्य संधी पाहून मग त्यांना ओळख देईन. ( पाहिलेंसें करून ) ती पहा, ती एक भिल्लांची टोळी त्या ओहोळाच्या बाजूनं झाडींतून बाहेर येत आहे. कसले तरी रानदांडगे लोक हे !—

( दिंडी ) नेत्र गुंजापरि असति लाल यांचे ॥ अंखुड धूसर केश ते मस्तकींचे ॥ पुष्ट काळे धि[illegible] शरीराचे ॥ दिसति डोंगर हे जणूं काजळाचे ॥

—अगबाई, प्राणनाथांची स्वारी य[illegible] मागून ऐटीनं घोड्यावर बसून चालली आहे. अहाहा ! आतां मात्र मी अगदीं निर्भय झाल्यें. चला तर जाऊन त्यांना गांठूं. ( जाते. )

( प्रवेश ५ वा—स्थळ, तेंच अरण्य. पात्रें,—शेजारीं घोडा एका झाडास बांधून झाला रत्नसिंग हांथरलेल्या गाशावर बसला आहे व शेजारीं रामकुंवर आपल्या मुसल्मानी वेषानें बसली आहे. )

रत्नसिं०—काय तुझं नांव ह्मटलंस ? रामप्रसाद ! मग रजपूत आहेस तूं ?

रामप्र०—होय, जातीनं तोच. वेष मात्र हा मुसल्मानी केला आहे.

रत्नसिं०—असं कां बरं ?

रामप्र०—तूर्त या प्रदेशांत तुर्कांच्या टोळ्या फिरत असतात, तेव्हां त्यांच्या दृष्टीस मी अल्पवयी एकटादुकटा रजपूत पडलों, तर सुरक्षित सुटायचा कठिण, जाणून हा वेष घेतला होता.

रत्नसिं०—पण आमच्याही सैन्याच्या टोळ्या तशाच या प्रदेशांत फिरताहेत. मग, त्यांच्या हातून ह्या वेषानें निभावण्याची तुला खात्री आहे का ?

रामप्र०—होय; कारण—

( साकी ) विशस्त्र किंवा एकाकी अरि तसा असावध असतां ॥ द्यावा त्यास उपद्रव ऐसें, शील नसे रजपूता ॥ हें मी जाणूनी ॥ होतों. निर्भय या रानीं ॥

रत्नसिं०—बरोबर आहे तें. पण हें आपलं शील आमच्या लोकांनीं ह्या दुष्ट तुर्कांशीं तरी आतां कां ठेवावं हें मला समजत नाहीं. अहो—

( ७ पद ) वागणें जशासि तसें ह्या जगीं बरें ॥ स्वार्थ साधनास हेंच इष्ट कीं खरें ॥ कौरवांसवें प्रसंग ह्मणुनि तेधवां ॥ पत्करणें भाग अन्य मार्ग पांडवां ॥ केलें कां असतें तरि कपट नरवरें ॥ वागणें० ॥

—तें असो; पण तूं या अशा रानावनांत एकटा भटकत कोणत्या हेतूनें फिरत होतास ?

रामप्र०—ऐकावें—

( ८ पद ) कांहीं कारण घडून झालों अप्रिय आप्तजनां ॥ त्या योगें हा मुशाफरीचा रुचला मार्ग मना ॥ करुन पराक्रम कांहीं आतां लौकिक मिळवीन ॥ प्रेमौघातें पुनः मजवरी त्यांच्या वळवीन ॥

रत्नसिं०—वः, हा तूं चांगला विचार मनांत आणलाहेस. कारण असें पहाकीं—

( दिंडी ) घरीं राहुनि तारुण्य घालवीती ॥ जाण नर ते आळशी मूर्ख होती ॥ ह्मणुन यौवन हें प्रवासांत कांहीं ॥ घालवीतां धनयशोलाभ होई ॥

—असो पण, अरे हा मुसलमानी वेष तुला अशा भटकण्यांत मोठा निर्भयपणाचा वाटला, तरी तुझ्या या सकुमार देहाचा कांहीं तितकाच तूं भरंवसा धरूं नयेस. एकट्यादुकट्या मुशाफरीच्या कष्टाला तो निरुपयोगी दिसतो.

राम०—अहो पण—

( ९ पद ) काळजि ती मी करूं कशाला ॥ प्रवासहेतुच संपला ॥ का० ॥ ऋणानुबंधचि कांहीं ह्मणुनी कींव स्वकी ही वाटली ॥ ज्यांना त्या तुह्मासचि जरि मी ही तनु अर्पिली ॥ काळजि० ॥

**रत्नसिंग**—तर काय तुझ्या मनांत आमच्या पाशीं चाकरीस राहायचं आहे?

**राम०**—एवढंच नव्हे, तर हरएक प्रसंगीं प्राणा पेक्षांही आपल्याला जपून ती चाकरी इमानानं बजवायची आहे.

**रत्न०**—मग तूं मलाच काय, पण आमच्या राजाधिराज महाराणाजींसही प्रिय होऊन मोठ्याच योग्यतेला चढशील.

**राम०**—( एकीकडे ) मला तरी तेंच पाहिजे आहे.

( एक जासूद येऊन मुजरा करतो. )

**जासूद**—महाराज, बादशाहाच्या सैन्यांतील फरिद्खान नामक एका सरदाराची टोळी या शेजारच्या खिंडींतून नुकतीच खालीं उतरत आहे. अशा अडचणींच्या ठिकाणीं आपण तिजवर छापा घालाल तर सहज फत्ते होणार आहे.

**रत्न०**—फार उत्तम आहे. करा तयारी. राणाजींच्या आज्ञे प्रमाणें आसपास फिरणाऱ्या मोंगली लष्कराचा मला समाचार घेतलाच पाहिजे.—

( झंपा ) **जाऊं असे हेच शत्रूंस गांठूं ॥ चला दुष्ट तेथेंच ते फार छाटूं ॥ पाहूनियां हा अकस्मात हल्ला ॥ करूं द्या तया " या नबी यार अल्ला " ॥ जाऊं० ॥**

—बरं रामप्रसाद, तूं आतां हा मुसलमानी वेष टाकून दे आणि एका घोड्यावर स्वार होऊन अगदीं माझ्या बरोबर ऐस चल.

राम०—आपण चलावें;मी हा वेष बदलून येतोंच. ( रत्नसिंग व जासूद गेल्यावर आपल्याशीं ) अहाहा !—

( १०पद ) साहस केलें होतें मी परि नीटपणें तें सर्वचि जुळलें ॥ ईशकृपेनें मजवरचें कीं अपेश मोठें हें टळलें ॥ साधन जें पतिच्या प्रेमाचें वियोगेंच होतें चुकलें ॥ तें या योगें आतां सहजच पहा पुन्हां हातीं आलें ॥

( जातो. )

---

# अंक पांचवा.



( प्रवेश १ ला–स्थळ, चितोरचा किल्ला.–पात्रें, शक्तिसिंह आणि सागरसिंह फिरत फिरत येतात.–देखावा, ठिकठिकाणीं छत्र्या, देवळें, जयस्तंभ वगैरे काहीं धड व काहीं उध्वस्त झालेलीं अशीं दिसतात.)

शक्ति०—कां सागरसिंह, आज आह्माला कोणीकडे फिरायला नेण्याची आपली इच्छा आहे ?

सागरसिं०—मर्जीस येईल तिकडे चला. ह्या चितोरच्या किल्ल्यावर सर्वच जागा हवाशीर आहेत. रोज कांहीं एकाच बाजूला जायला नको.

शक्ति०—पण कायहो, सागरसिंह, या इतिहासप्रसिद्ध पुण्यभूमीचा हवाशीरपणा एवढाच काहो गुण आतां आपल्या मनांत घोळत असतो !

**सागर०**—निदान तूर्त मनाला आराम तरी त्याच गुणांकडे लक्ष दिल्यानं होत असतो एवढं खरं. बाकीचे या भूमीचे गुण आठवतात; पण ते बेटे मनांत अतिशय अ-स्वस्थता उत्पन्न करतात.

**शक्ति०**—तर काय त्या अस्वस्थतेच्या भीतीनं तुह्मी त्या गुणांकडे मुद्दाम दुर्लक्ष करून, आला दिवस चैनीनं दवडीत असतां होय?

**सागर०**—तिला मी केवळ भीत नसलों तरी तूर्त निरर्थक मात्र मानतों खरी.

**शक्ति**—असं कां बरं ?

**सागर०**—अहो ती आतां मनांत बाळगून उगाच कोणावर चडफडत राहायचं आहे ? नाहीं ह्मणायला हें असलं रिकामं पिसं लावून घेऊन, आपल्याच ठिकाणीं आ-पल्या झिंज्या उपटीत त्रास, संताप, हाल, यांमध्यें दिवस काढायचे, असंच कीं नाहीं !

**शक्ति०**—तेव्हां ह्मणतां, आतां आपलं वित्त, जीवित आणि पुढील उत्कर्षाची आशाहि पण खाविंद दिल्ली-पतीच्या चरणीं अर्पण करून तिकडून मेहेरबानीनं जो काय तुकडा मिळेल तो चघळीत स्वस्थ राहावं, हाच मार्ग उत्तम, होय ना ?

**सागर०**—तूर्त बरातरी तोच वाटत आहे खरा.

**शक्ति०**—सागरसिंह, अहो इतके आपण बेहिमती

आणि—काय ह्मणूं ? पण आपला मी वडील भाऊ आहें तेव्हां ह्मणतोंच कीं—असे बेवकूब कशानं झालां, कीं अशी लाचारी आपण आनंदानं पत्करून रहात आहां ? अहो, या ठिकाणीं तरी तशी वृत्ति आपल्यामध्यें असायची नव्हती. हें इकडे पहा—अथवा कोणीकडे पहा ह्मणूं ? कोणीकडेही पाहिलंत तरी या ठिकाणचीं हीं मोठमोठीं स्मारक देवळं व जयस्तंभ तर काय, पण एथला प्रत्येक कण देखील, ज्यांच्या थोर पराक्रमाचं आणि अपार वैभवाचं आपणास सहज स्मरण करून देतो, त्या आपल्या आर्य पूर्वजांचं अगदीं ताजं ताजं अस्सल रक्त कीं हो तुमच्या या देहांत खेळत आहे ! या देखाव्यानं त्या रक्ताला स्वभावतांच जो कढ येतो त्याला तुमचं हें जड शरीर जर व्यर्थ करीत असेल, तर तशा त्या क्षुद्र देहाची छाया सुद्धां या भूमीवर पडावी हें योग्य नाहीं ! अहो, असं स्थळ शत्रूंच्या मेहेरबानीनं मिळविलेल्या राजचिन्हांनीं आपण भूषवावं, त्यापेक्षां तें कोल्ह्याकुत्र्यांचंच निवासस्थान होऊन उदास आणि भयाण स्थितींत राहिलेलं काय वाईट बरं ? हें पहा, भरतभूमीच्या मेवाडरूपी या भालप्रदेशावरील हा चितोररूपी कुंकुमतिलक दुष्ट तुर्कांच्या हातानं जो पुसला गेला आहे, तो तिला एथल्या या विजय स्मारकांस योग्य अशाच कृतींनीं लागला पाहिजे. आणि तसा तो तिला पुनः लावायला खरा वीर-

वीर पुरुष एक तो प्रतापसिंहच समर्थ आहे हें आपण पक्कं समजावं.

**सागर**—पण त्या प्रतापसिंहाचं आतां नांव कशाला? तुमच्या सारखंच या मिथ्याभिमानाचं वारं भरून स्वारीनं हातचा मेवाडही घालवून टाकला, आणि आतां कोठें दरी खोऱ्यांत लपून छपून वनवास मात्र भोगीत फिरत आहे ह्मणून ऐकतों.

**शक्ति०**—तो लपून छपून आहे किंवा ठिकाठिकाणच्या यवनी लष्करावर वरचेवर हल्ले करून त्यांस अगदीं त्राहि का पळूं करीत आहे, हें आपल्या चैनीपणाला इथं कोठून कळणार आहे! तें असो; पण काय हो, स्वातंत्र्यप्रीति, स्वदेशाभिमान इत्यादि गुणांची किंमत आपण अगदीं कमी लेखतां काय? हें या कुंभोराण्याच्या जयस्तंभावर काय लिहिलं आहे तें वाचा बरं—

(श्लोक) **देई प्रकाश रवि जोंवर या महीला ॥ राहील जों [illegible]हि हिमालयाला ॥ सीमा तशी उदधि जों न अतिक्रमेल ॥ तों कुंभकीर्ति अवनीवर या असेल ॥**

—ही योग्यता आपल्या पूर्वजांना या गुणांमुळंच आली आहे, हें आपणास ठाऊक नाहीं वाटतं?

**सागर०**—मग, मी ह्मणतों, प्रतापसिंहालाच या गुणांचा प्रसाद असा हाल व वनवास या रूपानं कां?

**शक्ति०**—अहो त्याचं जें कारण तेंच तर जेव्हां तेव्हां

या देशाच्या नष्टचर्येचं आणि आपल्या दौर्भाग्याचं कारण झालं आहे. नाहीं तर जिथें श्रीरामचंद्रजी युधिष्ठिरांसारखे पुराणप्रसिद्ध राजे तर असोतच, पण त्यांहून आपल्याला अधिक जवळचे असे पृथ्वीराज, समरसिंह, बाप्पारावळ, हमीर, कुंभो, संग यांच्या सारखे प्रत्यक्ष कृतांतासही शासन करणारे महान पराक्रमी राजपुरुष निपजले, तो हा देश परस्थ शत्रूंच्या दुष्टकृतींनीं वेळोवेळीं असा उध्वस्त पडून राहिला असता काय ? पण महाराज, हा आपल्यांतील एकजुटीचा अभाव, हें आपसांतील वैर, कशाही आपत्प्रसंगीं आपला खाजगी द्वेषच साधून घेण्याची ही दुष्ट खोड, अथवा निव्वळ स्वार्थबुद्धीनं उत्पन्न होणारा क्षुद्र अंतःकरणांतील हा विषारी मळ, यांपैकीं कोणतंही यास नांव द्या; पण हेंच याचं खरं कारण आहे. आपल्या कशाही सामर्थ्यास आणि नैसर्गिक वैभवास पार रसातळाला पोंचवून या पवित्र व अत्यंत सत्वगुणी आर्यभूमीसच नव्हे, तर प्रतापसिंहासारख्या तेजस्वी वीरांसही दुर्दशा भोगावयाला लावणारं हेंच एक घातक कालकूट आहे. सागरसिंह, अहो हें तीव्र विष आपल्यामध्यें किती भिनून गेलं आहे याविषयीं इतरांचीं उदाहरणं कशाला पाहिजेत ? खुद्द आपलाच विचार पहा, ह्मणजे झालं. राम लक्ष्मणांसारखे किंवा पांडवांसारखे पराक्रमी आपण एका घराण्यांतले सख्खे बंधु असतां,

केवळ खाजगी भांडणावरून राण्यासारख्या आपल्या अति उमद्या बंधूचे विरुद्ध होऊन त्याच्या शत्रुपक्षाचे साह्यकारी झालों आहोंत ना? एकमेकांच्या पाठीस पाठ लावून आलेल्या सख्ख्या बंधूंची जर ही स्थिति, तर मग मानसिंगासारख्यांनीं आपल्या खाजगी अपमानाचा सूड मात्र लक्ष्यांत पूर्ण ठेवून, रजपूतांच्या इतर सर्व शीलांस विसरून जावं व आपल्या सर्वस्वाच्या नाशास आपणच कारण व्हावें, यांत नवल कशाचं?

**सागर०**—शक्तिसिंह, खरं ह्मणता हें आपण. मला सुद्धां आतां या गोष्टीचा आपल्या भाषणावरून थोडा खेद होऊं लागला आहे. हें पहा आपण संधी साधून प्रतापसिंहाशीं संधी केलात; तसाच योग मला येईल तर खचित मी सुद्धां झाल्या गोष्टीची त्याच्यापाशीं क्षमा मागून या पातकापासून मुक्त होईन.

**शक्ति०**—मनांत खरोखर इच्छा असल्यावर, संधी काय, हवी तेव्हां आहेच.

**सागर०**—पण राण्याची एकदम जाऊन भेट घ्यायला त्याच्या तापट स्वभावामुळं मला फार भय वाटतं. तुमची गोष्ट वेगळी होती. माझ्या इतकं मोंगलांशीं तुमचं नातं-गोतं जुळलेलं नाहीं. आमचे एक चिरंजीव तर मोहोबत-खान बनले आहेत हें तुह्माला माहीत आहेच. तथापि तुह्मी ही संधी घडवून आणाल तर हा चितोरचा किल्लाच

नजराणा ह्मणून राण्यास अर्पण करून त्याची भेट घ्यायला मी राजी आहें.

शक्ति०—व: ! मी मोठ्या आनंदानं या कामीं आपला मध्यस्थ होईन. वाहवा, आपला हा विचार पाहून चार दिवस मी इथं आपल्या भेटीस आलों त्याचं खरोखर मोठं सार्थक झालं असं मी समजतों.

सागर०—आतां यांत बादशहाची थोडी इतराजी—

शक्ति०—होणारच; उघड आहे. केवढ्या शर्तीनं त्यानं हा किल्ला जिंकला होता, हें समोर ' अकबरका दिवा ' या नांवानं एक स्मारक चिरागदान आहे यावरून दिसतंच आहे. पण या मोंगलांची मर्जी तरी किती किमतीची असते हें मानासिंगाच्याच उदाहरणावरून पहा ह्मणजे झालं. हळदीघांटच्या लढाई नंतर त्यांनीं उदेपूर शहर वेढा देऊन घेतलं असतां, त्यांना हुकूम झाला होता कीं, तें शहर मोंगल लष्करास लुटून उध्वस्त करूं द्यावं. पण किती झालं तरी जातीचा रजपूत तो, आपलींच देवळादि पवित्र स्थानं उध्वस्थ करणं हें त्याला त्यावेळीं बरं न वाटून त्यांनीं तो हुकूम ऐकला नाहीं. पण त्यामुळं त्यांनीं आजपर्यंत बादशाही सत्तेची केवढी वृद्धि केली, ही त्यांची कामगिरी मनांत न आणतां, त्यांस कांहीं दिवस एकदम दरबार बंद झाला. तेव्हांपासून त्यांचं सुद्धां मन आतां या मोंगलां विषयीं पूर्वीसारखं वेल्हाळ राहिलं नाहीं.

**सागर०**—बस्स. माझ्या मनांत आला तोच विचार कायम. चला, असे चारबागेवरून वाड्यांत जाऊं.

(जातात.)

---

(**प्रवेश २ रा.—स्थळ**, अरवली पर्वताचा पहाड,—**पात्रें**, राणा प्रतापसिंह एकटाच आपल्याशीं विचार करीत येतो.)

**प्रताप०**—दैवाची गति कशी विचित्र आहे पहा!—

(१ पद) **श्रीमद्राजाधिराज राणा मी ह्मणवितसें ॥ स्वर्गतुल्य ऐशा या भूमीचा स्वामि असे ॥ सिंहासन-छत्रचामरादिक चिन्हें विलसे ॥ तो मी वनवासि असा एकाकी फिरत असें ॥**

—पण या स्थितीबद्दल मी सुख मानावं किंवा दुःख मानावं हेंच मोठं गूढ आहे. सुख मानावं तर मनाला किंचित् सुद्धां स्वस्थता नाहीं; सर्व प्रकारं हाल चालले आहेत. बरं दुःख मानावं तर अशा स्थितींत मी असलों यांत वाईट तें काय आहे? क्षत्रिय कुलांत माझा जन्म आहे, तेव्हां ही स्थिति मला सहजच आहे. आम्ही रजपुतांनीं कधीं अभ्यंग स्नान करावं तर कधीं रक्तानं न्हावं; शरीरावर कधीं रत्नालंकार धारण करावेत तर कधीं शस्त्रांचे वार असावेत. आमचं सदैव दैवच हें असं आहे. यांत विशेष तें काय मानायचं.—तर मग सुखी नाहीं आणि दुःखीहीं पण नाहीं, अशी कांहींअंशीं योग्यांची निर्विकल्प स्थितिच मी अनुभवतों आहें असं ह्मटलं पाहिजे. (फिरून.) अहो, संकल्प

केलेल्या माझ्या या देशसेवाव्रताची जोंपर्यंत पूर्णता झाली नाहीं, तोंपर्यंत सुखाची काय आणि दुःखाची काय सर्व स्थिति मला सारखीच आहे. अमुक स्थितींत मला अत्यंत दुःखी समजून तींत मी पडल्या बद्दल माझ्या शत्रूंनीं खुशाल आपले मनाशीं हर्ष मानावा; किंवा अमुक स्थितीला सुखाची मानून तींत मी नसल्याबद्दल माझ्या आप्तस्वकीयांनींही पाहिजे तर सखेद असावं; परंतु मी तरी या दोहीं-विषयीं अत्यंत उदासीन आहें.—

( २ पद ) **माझें व्रत मात्र मला एक तें दिसे ॥ त्याविण ती अन्य कांहीं कल्पना नसे ॥ माझें० ॥ येउं कसेही प्रसंग ॥ न घडे मद्धैर्यभंग ॥ सुखदुःखाचे तरंग ॥ क्षोभविनि न अंतरंग ॥ मिळविन यश निज वंशा भूषवीलसें ॥ माझें व्र० ॥**

—असो, हा समोर भिल्लवाडा दिसतो आहे, याच्या पलीकडे पहाडांत या लोकांच्या मातादेवीचं स्थान आहे. तिथं माझे सामंत सरदार वगैरे मला येऊन मिळण्याचा संकेत ठरला आहे, त्याप्रमाणं आपण तिकडे जावं. ( चालून ) कदाचित् एका जासुदानं नुकतंच येऊन सांगितल्याप्रमाणं कोमळमिराहून रत्नसिंह यांनीं इकडे पाठविलेलीं आमचीं माणसं ही याच सुमारास इकडे येण्याचा संभव आहे.

(जातो.)

---

( प्रवेश ३ रा.--स्थळ, भिल्लवाड्यांतलें एक झोंपडें-पात्रें—
भिल्ल व भिल्लीण. )

**भिल्लीण** ( झोंपडींतून बाहेर येऊन खाटेवर निजलेल्या आपल्या नवऱ्यास हलवून )—हं, उठा,—

( छक्कड ) हं उठा, बघा दिस किती आला ॥ उठा कि राना मर्दी चला ॥ हं उठा ॥—

**भिल्ल**—(त्रासानें तिला झिडकारून )—

—अग चल नग लइ वटवट लाऊं ॥ कां इचीभन तरास मला ॥ अर का इ०॥—

**भिल्लीण** ( त्याच्या अंगाशीं झोंबून )-

—उठाकिं राना० ॥ हं उठा ॥—

**भिल्ल**—

—उज्याडलं ह्ये तरिबि झोंबातिस ॥ अस्वल ह्मनु का हडळ तुला ॥ अग अस्वल० ॥

**भिल्ली०** ( त्याला बळेंच उठवीत )—

—उठाकीं रानामं० ॥ हं उठा० ॥

**भिल्ल**—रातसारी डुवांगर पहाड हींगता हींगतां ह्यें प्येकाट अक्षी मोडून ग्येलं बघ! आन् उगाच खिणभर डुवाळा लागतुया त आली लावसटावानी! जा, आज तूंच जाऊनशानी रानांतन् कांहीं शिकार आन जा.

**भिल्ली०**—तर तर, त्यें न्हाइ माझं काम.

**भिल्ल**— काय? तुझं न्हाइ काम, हं? आन तुझा हुकूम ऐकन्याचं माझं काम हाए व्हय? अग ह्यो तुजा धनी हाय धनी! ऐकलस.

भिल्ली०—आन् मीबी धनीनच! नव्हका धनीन?

भिल्ल०—आं? दोघंबी धनीच! मंग तर तुझं माझं भांडन व्हईल. अग या रायठान्याचं आमच म्हाराज परताप-सिंह धनी हाएति, आन् त्यो म्वागल बादशाबी हतला धनी व्हऊ बघतुया, त्यवा तर दोघांचं आज लई दिव-सापून भांडन चाललया. तस तुझं माझं व्हनार व्हय?

भिल्ली०—त्ये काईबी म्हना, मी धनीनच हाए.

भिल्ल—आन् तुझा चाकूर मी व्हय? थूः तिच्या!—

( छक्कड ) अग वा ग वा वाहवा! ॥ चल धनिन कुनाची होशी ॥ अग० ॥ शिकार करुनी रानामंदीं खुशाल राजावानी ॥ राहनार पठ्याला चाकुर बायकुचा तूं क-रशी ॥ अग० ॥—

भिल्लीण—

—भाहर खपुनी तुह्मी रातदिस करतासा भर माजी॥ मी तर असत्ये बसुन घरांतचि धनिन नव्हं मी कशी ॥—

भिल्ल—

—अग वा ग वा वाहवा ॥ चल धनि० ॥

भिल्लीण—मंग तर याचा आदीं न्यावच झाला पाहिजे.

( राणा प्रतापसिंह येतांना लांब दिसतो त्यास उद्देशून. )

भिल्ल—अरे ए बाबा, तूं आमचा म्हाराज नसलास तरी बघ तिऱ्हाइत हाएस. त्यव्हां आमचा यवढा न्याव कर बरं. ही बायकु माझी धनीन का मी इचा धनी? कस?

**प्रताप०** ( आपल्याशीं )—हं:, काय बेट्यांना धनी-पणाची ईर्षा आहे पहा. आणि आमच्या रजपूतांनीं तर आपला धनीपणा मोंगलांस अर्पण करून, आपण त्यांचे दा-सानुदास होऊन रहाण्याचं आरंभलं आहे! (उघड) अरे तंटा करूं नका. हें पहा, तुह्मी दोघंही आपआपल्यापरी धनीच आहांत. ( भिल्लीणीस ) अग, तूं आपल्या घरच्या कारभारांतील धनीण, आणि ( भिल्लास ) तूं बाहेरच्या व्यवहारांतला धनी, समजलांत.

**भिल्ल**–( आश्चर्यानं ) काय? आमी दोघंबी धनीच!

**भिल्लीण**–मग आमुचा चाकुररे कोन? तूं कां?

**प्रताप०**—( हंसून ) हो, तसंही कां ह्मणानात! ( आपल्याशीं ) ज्यांना आपलेपणाचा अभिमान नाहीं, अशा आमच्या त्या मूर्ख बनलेल्या रजपूतांमध्यें धनी ह्मणून मिरविण्यापेक्षां, या भोळ्या पण स्वातंत्र्यप्रिय लोकांचं चाकर होणं काय वाईट?

**भिल्ल**—तर मंग जा गड्या. या शेजारच्या रानांतन एकादी शिकार घेऊनशान ये बरं.

**भिल्लीण**–आन् तसच त्या वढ्यावरन पान्याचा घडा-बी भरून आन कसा.

**प्रताप०**—बरं आहे धनीसाहेब! ( आपल्याशीं ) यावेळीं यांच्या या गुणांचा गौरव मला यांची अशी कांहीं चाकरी करूनच करतां येईल. ( जातो. )

**भिल**—( आनंदानें बायकोचा हात धरून )—

( लावणी ) बघ मजा कशी अग दोघबी झालों धनी ॥
॥ बघ० ॥ चल जाऊं घरांत ॥ दोघ मिळुन संगात ॥
बसुं खुशाल मजेंत ॥ मी राजा तुंबी राणी ॥ बघ मजा० ॥

( दोघे ऐटीनं झोंपड्यांत जातात. एक हेर येतो. )

**हेर**—ए ! इथं कोण आहेरे ?

**भिल्ल**—( झोंपडीच्या दाराशीं येऊन ) इचीभन, कारे तरास आनखी ह्यो ?

**हेर**—अरे ए गड्या, आमचे धनी इकडे आलेत ह्मणून कळलं. तर ते कुठं आहेत हें तुला माहित असल्यास सांग बरं.

**भिल्ल**—हत तुजा धनी कोन असनार ? अर हथला धनी मी, आन घरामंदी ती माजी बायकु धनीन. ए कारभारनी.

**भिल्लीण**—( ओरडून ) का ह्मनतायसा ?

**भिल्ल**—यें, अस क्येंकासती कशापायीं गे जरा भाइर ये. ( हेरास ) ही बघ, ही तुला व्हांवी.

**हेर**—हिलारे मी घेऊन काय करूं ? बाबा तुलाच ती लखलाभ असो ! अरे मला प्रतापसिंह महाराज पाहिजेत, कांहीं जरूरीच्या कामाकरितां मी त्यांना पाहतों आहे. ( पडद्याकडे पाहून हे पहा, आलेच ते.

**भिल्ल** ( चपापून )—आं ? आमच महाराज ह्ये ! असं कसं ? पण व्हय, त्येच. त्यऱ्हा पाह्यल व्हत त्येला

आन् आताला किती ह्यो बदल झाला हैंच्यांत अरेरे !
( नवरा बायको आपसांत एकमेकांवर कातावतात. )

( प्रतापसिंह येतो. )

हेर ( मुजरा करून )—महाराज !

प्रताप०—थांब, हें आमचं धनीसाहेबांचं जोडपं इथें आहे, त्याला त्याची बजावलेली कामगिरी सांगूं दे.

भिल्लभिल्लीण—( पायां पडून )—म्हाराज, आमी चुकून आपला गुन्हा क्येला. माफी करावी.

प्रताप०—अरे बाबांनो, तुमच्या या निष्कपट साधेपणानं अपराध हा तुह्माला शिवतच नाहीं. मग त्याची क्षमा ती काय करायची आहे. उठा. ( हात जोडून दोघे उभे राहतात. ) बरं, पण कायरे, या भिल्लवाड्यांत कोमळमिराकडून आमचीं कोणी माणसं आलीं आहेत का ?

भिल्ल—व्हय सरकार. कालच रातच आपल लालजी ह्माराज आन् बाईसाब यांसन घेऊनशान मीच तकडन आलों. आन बाकीची मानसंबी मागून यायची व्हती. आतापौत समदी भउदा आली बी असत्याल. त्या आमच्या माताजीच्या घेवळांत हायती.

प्रताप०—ठीक आहे. तर मग मीही इतक्यांत तिकडे येतों ह्मणून तुह्मी पुढं जाऊन तिकडे कळवा, जा.

( भिल्ल व भिल्लीण जातात. )

हेर—महाराज, दिल्लीहून हें एक पत्र आलंय म—

पृथ्वीराज राठोड यांनीं तें पाठविलं असून त्यांच्याच खाजगी जासुदानं आणून दिलं आहे. ( पत्र देतो. )

प्रताप०—मागेंत ज्या प्रमाणं तुळस त्याप्रमाणं दिल्ली-पतीच्या दरबारांतील त्या भ्रष्ट रजपूत मनसबदारांमध्यें एवढाच उमदा मोहरा राहिला आहे! ( पत्र पाहून ) वः, पत्र तर कविताबद्ध पाठिवलं आहे. ( वाचूं लागतो. )

( श्लोक ) " श्रीमत्क्षात्रकुलावतंस नृपते भो मेदपाटेश्वर ॥

—हे शब्द मला मोठे अभिमानाचे वाटत, पण आतां लज्जा उत्पन्न करतात!—

" सद्भावें विनयें नमूनि करितों ही पत्रिका सादर ॥
" कांहीं हींत अति प्रसंग असला त्याची क्षमा तूं करी ॥
" कीं त्वत्कीर्तिसुगंधलुब्ध अलि ही ठेवून धी किंकरीं ॥

—वः, यांत नम्रता आणि प्रेम दोन्ही भाव अतिशयच दिसतात!—

" स्वातंत्र्या मुकलों न केवळ परी अस्मत्कुलें भ्रष्टलीं ॥

—खरं तें, पण याबद्दल नुसतं रडून काय उपयोग. अंत:करणांत नेहमीं जळत असलं पाहिजे.—

" स्वातंत्र्या मुकलों न केवळ परी अस्मत्कुलें भ्रष्टलीं ॥
" तीं दोन्हीं परि आत्मविक्रमबळें तूं मात्र संरक्षिलीं ॥

—श्री एकलिंगजीची कृपा, माझी शक्ति किती!—

" देतां सोडुनि तूं—

—( नीट न्याहाळून ) काय?—

ोडुनि तूं हि आमुचि गती ती काय व्हावी बरें ॥
ाण अशुद्ध सांग मग तो कैचा पुढें उद्धरे ॥

—पण ही या गृहस्थाला शंका कोठून आली? बरं पुढं पाहूं.—

" झालों दास जरीहि दिल्लीपतिचें श्रष्टत्व संपादुनी ॥
" नाहीं मानित तुच्छ तो तुजमुळें आह्माप्रती आझुनी ॥
" आहे दर्प जसा शहाप्रति तुझा आशा तशी आमुतें ॥
" होतें व्यर्थच सर्व काय परि हें शंका अतां वाटतें ॥

—अरे पण अशी शंका घेण्याचं कारण काय झालं आहे,—

" **मूर्खत्वें गुण मुख्य दोन अपुले आह्मी विकूं काढिले॥**
" **धूर्तत्वें सहजींच दिल्लिपतिनें स्वार्थास ते लाविले ॥**

—आपलं गमावल्याबद्दल आमच्या लोकांच्या मूर्खपणाची जितकी निर्भर्त्सना करावी, तितकीच आमचं गमावलेलं युक्तीनं आपल्या कार्यास लावून घेतल्याबद्दल दिल्लीपतीच्या चतुराईचीही पण तारीफच केली पाहिजे.—

"**अस्मत्शौर्य तशी समस्त आमुच्या स्त्रीजातिची शुद्धता॥**
"**आतां एक कुलीं तुझ्याच असशी त्या तूंच संरक्षिता ॥**

—श्री एकलिंगजी त्याचं रक्षण करणार!—

" **राणाजी, अशि वेळ लौकर पहा ती निश्चयें येइल ॥**
" **पश्चात्ताप समस्त या रजपुतां तेव्हां खरा होइल ॥**

—पण ती लौकर येईल तर बरं. कांहीं तेज आंगांत आहे तों उपयोग. पण हल्लींच्या क्रमानं तें पार नष्ट होऊन एकदां विझून गेलेल्या कोळशाप्रमाणं झालों, ह्मणजे सर्वांच्या पायतुडवणीला जें पात्र होऊन बसूं तें कायम—'

" राणाजी अशी वेळ लौकर पहा ती निश्चयें येईल ॥
" पश्चात्ताप समस्त या रजपुतां तेव्हां खरा होइल ॥
" भिक्षा ते मग मागतील तुजला लाचार वा होउनी ॥
" द्यावें त्यांप्रति शुद्ध बीज मग हें जें ठेविलें रक्षुनी ॥

—शेवटीं आमच्या उत्कर्षाची एवढीच का ही आशा! ईश्वरा, ही तरी व्यर्थ होऊं देऊं नकोस!—

" गेलें जाउं समस्त वैभव तुझें श्री राज्य हीं नश्वर ॥

—खरं आहे.—

" स्वातंत्र्यप्रियते मुळेंच असती तूं राजराजेश्वर ॥

—कशाला हा माझा व्यर्थ एवढा गौरव!—

" राहो अक्षय उग्रतेज तव हें सामर्थ्य शस्त्रीं तसें ॥
" आशिर्वाद न मीच हा तुज परी सारी मही देतसे ॥

—( पत्र मस्तकास लावून ) तर मम या आशीर्वादास मी 'तथास्तु' ह्मणून हें पत्र शिरसावंद्य मानतों. ( हेरास ) अरे, हें पत्र घेऊन येणाऱ्या त्या मनुष्याला इकडे आण बरं.

( जासुद जातो व चित्रभाष येतो. )

प्रता० ( पत्र देऊन )—चित्रभाष, हें पत्र पहा. पृथ्वीराज राठोड यांणीं दिल्लीहून पाठविलं आहे.

चित्र०—( पत्र पाहून ) वाहवा! या राठोडांची तरवार जरी मोंगलांच्या वैभववृद्धीस वाहिली गेली आहे, तरी तिच्यापेक्षांही सामर्थ्यवान् अशी आपली वाणी या वीरानं तुमच्याच सेवेला पाठविली आहे.

प्रता०— खरं ह्मणतां आपण. माझ्या कृतीचा असा

गौरव केलेल्या या वाणीचा मला पुष्कळच उपयोग होईल यांत संशय नाहीं. अहो—

( दिंडी ) **कितिहि दुर्घट हें कार्य मला भासो ॥ कष्ट सायासहि यांत बहुत सोसो ॥ गौरवें जरि मत्कृति स्वजन पाही ॥ तसें उत्तेजक अन्य मला नाहीं ॥**

चित्र०—अहो, असं उत्तेजन आपल्याला उत्तरोत्तर पुष्कळच मिळत आहे.—

( ४ पद ) **स्वदेशसेवाव्रत संकल्पुनि ॥ चालवीतसां कष्टहि सोसुनि ॥ प्रेमचि तेणें तुह्मांविशिं जनीं ॥ अधिकाधिक वाढे ॥ अंतरिंचा स्वप्रेमादर तो ॥ व्यक्त करीं जन शब्देंचि न तो ॥ अन्य तऱ्हेनेंहि तो दावितो ॥ बहु आगत्यानें ॥**

—हें पहा, या आरवली पर्वतावरील एका जैन देवळांत नुकतीच, आपल्या शहरचे श्रीमंत सावकार भामाशा यांची व माझी अकल्पित गांठ पडली. तो गृहस्थ आज कित्येक वर्षें तीर्थयात्रा करीत दूरदूर फिरत होता. पण इकडील हा सर्व प्रकार ऐकून त्या प्रपंचविन्मुख वृद्धासही तुमच्या कृतीचा अभिमानच वाटून तो आपल्या भेटीकरितां परत फिरला आहे, आणि आपण पिढ्यानुपिढ्या सांचविलेली आपली सर्व संपत्ति यावेळीं तुमच्या उपयोगी विशेष जाणून ती सर्व तुह्मांला अर्पण करण्याचा त्याचा विचार आहे.

**प्रता०**—अहो, ह्या लोकांच्या अशा एकेक उपकृतिचा मजवर जो हा भार होत आहे, तो सहन करून त्याचा

परिणाम गोड करण्याचं सामर्थ्य मात्र मजमध्यें असंच रहावं, एवढी आतां श्री एक लिंगजीची प्रार्थना आहे. असो. पण काय हो, चित्रभाष, पृथ्वीराज राठोड यांच्या या पत्रांत आमच्या कृतनिश्चयाचे दृढतेबद्दल जो संशयी उल्लेख आहे, त्याचा हेतु काय असावा बरं?

**चित्रभाष**—अहो उघडच आहे तें. असं पहा—

(साकी) **कष्टव्रत हें केवळ परार्थबुद्धीनें सोसाया ॥ लोकोत्तर तें धैर्य पाहिजे ऐसें जाणोनीयां ॥ सावध केलें हें ॥ वाटे शंका ती नोहे ॥**

—( पडद्याकडे पाहून ) हे पहा दिवाणजी आले; झाला रत्नसिंहजी यांज कडून पूर्वी आपणास सूचना आली होती त्याप्रमाणं कोमळमिराकडून आपलीं माणसं इकडे आलीं वाटतं ( घाबरून ) पण हें काय? हे असे खिन्नमुख कां?

**दिवाण** ( खिन्न मुद्रेनें येऊन मुजरा करतात )—राणाजी, आपलीं सर्व माणसं या माताजीच्या मंदिरांत येऊन सुरक्षित पोंचलीं; परंतु रामकुंवरबाई मात्र किल्ल्यावरूनच एकाएकी ज्या कुठं नाहींशा झाल्या, त्यांचा अद्याप कांहीं पत्ता लागला नाहीं. दासीच्या सांगण्यावरून पूर्वीच त्या मुसलमानी वेषानं किल्ल्याबाहेर पडल्या होत्या असं कळतं. तेव्हां गुप्त हेर चहूंकडे पाठवून त्यांचा शोध चालविला आहे. कदाचित् शत्रूंच्या हातीं त्या लागल्या कीं काय असाही संशय येतो.

**प्रताप**०—( आवेशानें )—हां आणि तेंच खरं आहे.

आतां माझ्या ध्यानांत आलं. या पत्रांतील संशयाचें श्व-हेंच बरं. समजलों. ही कारटी शत्रूच्या हातीं सांपडली असावी, तें वर्तमान हां हां ह्मणतां दिल्लीस पोंचलं असावं; आणि त्याबद्दल तिथं जो जयोत्सव होऊं लागला असेल, त्यांत फक्त या गृहस्थास मोठी हळहळ वाटून आमचं हें उरलेलं वैभव तरी आह्मी नष्ट होऊं देऊं नये, ह्मणून त्यानं आह्माला जागं करण्याकरितांच ताबडतोब हें पत्र रवाना केलं असावं. ठीक आहे; दिवाणजी, झाला रत्नसिंहजी यानां एकदम कोमळमिराकडे जायला सांगा, आणि आह्मी थेट उदेपूर गांठतों. बस्स, आतां बारीक सारीक हे हल्लेछापे बंद करून मोठ्या निकराचंच रण आरंभलं पाहिजे. रामकुंवर हातीं येईपर्यंत या मेवाडांतून एकही तुर्क बाहेर पडूं देणार नाहीं. सर्वांना इथल्या इथं गारद करून टाकीन.

**चित्र०**—राणाजी, पृथ्वीराज राठोड यांच्या पत्राला आपणास उत्तर पाठवलं पाहिजे.

**प्रताप०**—मग तें असं लिहा—

(साकी) **अचल जसा नग मेरु ज्यापरी ध्रुवनक्षत्र स्थिर तें ॥ अस्मत्कृतनिश्चयसामर्थ्यहि तसेंच दृढ आहे तें ॥ शंका घेऊं नये ॥ अनुभव याचा लौकर ये ॥**

—अथवा नको. उत्तर असं लिहून कळविण्यापेक्षां या पत्राचा परिणाम काय झाला आहे, हें त्या जासुदाला या मेवाडांतून प्रत्यक्ष पाहूनच जाऊं द्या.

परिणामपत्रे०—आणि इथली आतां बातमी दिल्लीस नेण्याची पाळीही पण त्या जासुदासच येणार आहे. कारण आपल्या अशा त्वेषामुळं—

(५ पद) हें रणकुंड भयंकर पेटे ॥ ज्वाला याची गगना भेटे ॥ दिग्मंडल धूम्रानें दाटे ॥ हेंच मला दिसतें ॥आतां॥ हवन होय यवनांचें अवघ्या ॥ सर्पसत्रसम तें ॥ आतां ॥

प्रताप०—ठीक आहे. दिवाणजी, चला सर्वजण त्या मताजीच्या मंदिराकडे—

(६ पद) चढवूं पोषाख चला सर्व केशरी ॥ शस्त्रास्त्रें सज्ज बनुनि घेउं सत्वरीं ॥ स्त्रीजनांस देवीच्या भेटुं मंदिरीं ॥ मोहपाश किमपि न तें ठेवुं अंतरीं ॥ स्मरुनि वीर पूर्वजांस जाउं संगरीं ॥ चढवूं पोषाख च० ॥

(जातात.)

---

(प्रवेश ४ था. –स्थळ, पहाडांतील माताजीचें मंदीर.–पात्रें, कांहीं भिल्ल व भिल्लिणी.)

भिल्ल व भिल्लिणी—(पुढील पद्य म्हणून देवीची आरती चालली आहे)—

(७ गाणें) तुला नमीतों आई भवानी ॥ आई भवानी देवी भवानी ॥ तुला० ॥ राणाजींना जय दे देवी ॥ राख तया तूं सुखी भवानी ॥ तुला० ॥

(हें गाणें संपण्याच्या सुमारास केशरी पोशाख केलेल्या कित्येक स्त्रिया, राणि व कुमार अमरसिंग येऊन देवीचें दर्शन घेऊन एका बाजूस उभ्या रहातात व पुढील पद्यानें देवीचें स्तवन करितात)

(८ पद) हेऽऽऽ देवि भवानी सकलोद्धारिणि विश्वकारिणी रक्तकपालिनि पापघ्नी रुद्राणी ॥ हेऽऽ देवि ॥ करुनि तुझें वंदन स्तवन हें प्रार्थितसों त्रिजगज्जननी ॥ कृपादृष्टि आह्मावर ठेवीं ॥ हे खलचित्तद्वेषिणी रुद्राणी॥ हे ऽऽऽ देवि० ॥

(वरील पद्य संपण्याचे सुमारास केशरी पोषाख केलेली महाराण्यासह पुरुषमंडळी येऊन दर्शन घेऊन दुसऱ्या बाजूस उभी राहते. व पुढील पद्यानें देवीचें स्तवन करते.)

(९ पद) जय जय श्री आदिमाते ॥ अखिल विश्वाधारभूते ॥ खड्गतोमरपाशहस्ते ॥ असुरमर्दिनि मंत्रमूर्ते ॥ जय जय० ॥ क्रोधमुखि आद्यंतरहिते ॥ दुष्टकुलसंहारकर्त्रे ॥ क्षात्रतेजोमूलललिते ॥ योगसंभूते, नमस्ते ॥ जय जय श्री० ॥

प्रताप० (राणीला उद्देशून)—कां, आपण अशा खिन्न मुखानंच का आह्माला यावेळीं निरोप देणार ह्या?

राणी—आह्मी रजपुतांच्या स्त्रिया, जल्मापासून आमचं सारं आयुष्य नेहमींच अशा प्रकारच्या अनेक प्रसंगांला पात्र असतं. तेव्हां आह्मी कशाला तें खिन्न असायचं आहे. नाहीं ह्मणायला रामकुंवरसाठीं मन ह्यावेळीं थोडं उदास झालं असलं, तरी हें पहा तो उदासपणा क्षणभर दूर ठेऊन वीरपत्नीला योग्य अशा प्रसन्नमुखानंच आपल्याला निरोप द्यायला मी तयार आहें. हा विडा घ्यावा आणि जगदंबेच्या कृपेनं लढाईतून विजयी होऊन परत यावं.

प्रता०—ठीक आहे. आह्मी युद्ध प्रसंगांत आहों, तोंपर्यंत ही भिल्ल मंडळी या पहाडावर आपलं रक्षण करील.

जगदंबेच्या कृपेनं आह्मी तिकडे विजयी झालों ह्मणजे आपणाला इथून घेऊन जाऊं. परंतु कांहीं अन्यथा प्रकार व्हावा अशी भगवदिच्छा असल्यास, रजपूतस्त्रियांच्या संप्रदायाप्रमाणं आह्माला कोणत्या मार्गानं येऊन मिळायचं हें आपल्याला माहीत आहेच.

राणी—पण चिरंजिवाचं काय ह्मणणं आहे, तें एकदां ऐकायचं होतं.

प्रताप०—काय आहे लालजी ?

अमरसिंह ( पुढें येऊन )—

( १० पद ) मी येतों न्या मला ॥ युद्धाला न्या मला ॥

प्रता० ( त्याची पाठ थोपटून )—

—वाहवा, वाहवा॥ तूं अससि लहान अति ॥ कठिण समरक्षाति ॥ धैर्य टिके तव तें किती ॥ हट्ट नव्हे चांगला॥ हा हट्ट नव्हे चां० ॥—

अमरसिं०—

—बघुनी तुमचा रणीं पराक्रम ॥ तसाच ही तो द्राखवीन मम ॥—

प्रता०( त्याला दूर करून )—

—जा जा ॥

अमरसिं०—

—अं हं ॥

प्रता०—

—छे छे ! ॥

—अंहः ॥ येतों न्या मला ॥ युद्धा० ॥

प्रता०—

—वाहवा वाहवा ॥ तूं अस० ॥......नव्हे चांगला ॥

अमर०—महाराज, असं पहा—

(११ पद) सिंहाच्या छाव्यास नसे कधिं अल्पवयाची शंका ती ॥ गजमस्तकभेदनक्रिया ही सहजच लीला त्याची ती ॥ ह्मणुनि मला न्या समरातें ॥ निज भुजबल दाविन रिपुतें ॥ ह्मणविन धन्य स्वकुलातें ॥

चित्रभा०—शाबास लालजी, आपण तर यावेळीं राणाजींना अगदीं निरुत्तरच केलंत.

प्रता०—अरे पण तुला पराक्रम दाखवायला माझ्या बरोबरच आलं पाहिजे, असं नाहीं. प्रसंग आल्यास इथंही मागं त्याचं अगत्य आहेच. बरं, आतां हा प्रेम-पाश आंवरून धरा. चला.

(सर्व स्त्रिया राणी व लालजी जातात.)

प्रता०—(आपले सरदारांस)—पटावत सामंत सर-दार हो,—

(१२ पद) चला तयार व्हा स्मरा स्मरारि अंतरीं ॥ करा नियुद्ध घोर आज समर भूवरी ॥ न जाउं द्या जिवंत शत्रु परत एकही ॥ करा विलिप्त रक्तमांसकर्दमें मही ॥ उपसा आपुल्या तरवारी ॥ खुपसा त्या अरिच्या उदरीं ॥ चला निघा या समरावेशें मागोमाग ॥ चला त० ॥

(त्वेषानें सर्वजण राण्याचें मागोमाग निघून जातात)

# अंक सहावा.

(प्रवेश १ ला-स्थळ, दिल्लीशहर, बादशहाचा राजवाडा.—पात्रें, पृथ्वीराज राठोड आणि गाझीखान समोरासमोर येऊन भेटतात.)

**पृथ्वी०**—कां गाजीखान, अजमिराहून हे आतांच आलां वाटतं. बरं कशी काय मेवाडाकडील खबर?

**गाझी०**—अजी खबर क्या, राणा फिर जबरदस्त होगया और हम सबकी कबरें वहां बनेंगी ऐसा वख्त आया!

**पृथ्वी०**—ह्मणजे?

**गाझी०**—राणानें यकायक जगाजगा हमारे लष्करपर छापे करके जव्हां वहां सबकु कतल करडाला. ऐसे जोरके हुमले और ऐसी बेरहीमीका कतल राजपूतोंके हाथसे अबीतक कबी नहीं देखा था. मेवाडसे अब येकभी आदमी जिंदा आयेगा एसा मुझे भरोंसा नहीं है.

**पृथ्वी०**—आणि मानसिंग बिनसिंग कुठं आहेत?

**गाझी०**—मानसिंगका मालपुरा तो पहिलेही राणाने लुटलाट कर पार किया, इसे ओतो आपनाही रोना रोते है!

**पृथ्वी०**—पण कायहो, हें असं झालं तरी कसं? इकडे पारून जासुदावर जासूद येऊन बातम्या कळत होत्या, कीं आ-च्या मोंगललष्करानं—आज काय अमुक किल्ला घेतला, तमूक शहर लुटलं, कोणी सांगे कीं राणा आपलीं बायका-

पोरं घेऊन वनवास भोगीत फिरत आहे, एकदां कळे तो आतां देशत्याग करण्याच्या विचारांत आहे, कोणी ह्मणावं इतक्यांत तो बहुधां शरणच येईल, एकानं तर अशीही बातमी आणली होती कीं, राण्याची मुलगी नाहींशी झाली असून ती शहाबाझखानाच्या छावणींतच निःसंशय पकडली जाईल. याप्रमाणं एका पेक्षां एक आनंदाच्या बातम्या इकडे आल्या असून इथं केवळ्या उत्साहाची व शहाजादे साहेबांच्या स्वागताची तयारी या अमीर उमरावांनीं चालविली होती, आणि तुह्मीं त्यांच्या रंगाचा अगदींच भंग करण्याचं हें काय वर्तमान घेऊन आलां आहां ? छे:, आपल्याला नाहीं हें खरं वाटत. मी दरबारांत नेहमीं राण्याचा पक्ष घेऊन त्याच्या तर्फेनं बोलत असतों, ह्मणून आपण उगीच असं माझं मन पहात असाल हें, झालं !

**गाझो०**—देखो बादशहाके हुजूरमे देनेके वास्ते शहाजादाने ये खत मुझकू दिया है. इस्से सब हाल जाहीर हो जायगा.

**पृथ्वी०**—( आपल्याशीं )—आणि मला कुठं तिकडली बातमी कळायची राहिली आहे ? मी महाराण्याकडे कविताबद्ध पत्र देऊन पाठविलेल्या माझ्या जासुदानं येऊन सर्व प्रकार मला सांगितला आहेच. पण ह्मटलं हे राजश्री आपल्या जातिस्वभावाप्रमाणं ही पराजयाची बातमी सुद्धां किती फुशारकीनं सांगतात तें पाहावं. छे, पण ज्याअर्थी

बढाईचा एकही शब्द निघत नाहीं, त्या अर्थी मेवाडांत यांच्या लष्कराची रग राण्यानं पुरतीच जिरवली आहे खरी. (उघड) बरं, चला तर तो लखोटा घेऊन. हुजूरची स्वारी यावेळीं—आज शुक्रवार, होय ना—तिकडे इबादत-खान्यांत बसली असेल.

गाझी०—इबादतखाना, ये क्या है भला ?

पृथ्वी०—या नांवाची नुकतीच इथं एक इमारत झाली आहे. आणि तींत हिंदु, महमदी, बौद्ध, ख्रिस्ती, जैन, वगैरे सर्व धर्मांतील पंडितांची मोठी सभा स्थापन झाली असून, अनेक धर्मवाद्यांचे मोठमोठे वादविवाद तिथं चालतात व ते ऐकण्यास हुजूरची स्वारीही दर शुक्रवारीं तिकडेच जात असते.

गाझी०—तुम लोग हमारे बादशहा सलामतकु जितना नचाओगे उतनाही थोडा है. तुमारे फंदेमें फसकर जो कोशीस के पेहेले बादशहाओनें महजबे इस्लामके फेलानीके वास्ते किई थी, उनमेसे बादशहाके दिलमें तो एकभी नही रही. हमकु ये डर है के एकना एक दिन ओतो अब हिंदुही होजायेंगे !

पृथ्वी०—वः, मग तसं झालं तर त्यांत काय बिघडलं ? हिंदू तुर्कांचं वैर नाहींसं होऊन उभयतांनीं सलोख्यानं रहावं अशी जी बादशहाची व त्याचप्रमाणं तुमच्या कित्येक [illegible] मोंगल सरदार पंडितांची इच्छा आहे, ती या वृत्तीनं

तर लौकर व अगदीं बिनतोड साधणार आहे.

**गाझी०**—क्या ? हम अपना इस्लामी महजब छोडकर हिंदु बनजावे, इसके शिवाय तुमारे हमारे एक दिल, होनेका और कुई रस्ता नही ?

**पृथ्वी०**—तुमच्या समजुतीनं तुह्मी दोन उपाय योजिले होतेच. पण त्यांपैकीं एकाची वाट कधींच लागली, आन् दुसराही त्याच पंथांत आहे.

**गाझी०**—भला, इसका क्या मतलब ?

**पृथ्वी०**—अहो आमच्याशीं मिळूं येण्याचे आजपर्यंत तुमचे उपाय हेच ना ? किं एक तरवारीच्या जोरानं आह्मांला मुसलमान करावं किंवा दुसरा मोठमोठ्या मनसबदाऱ्या देण्याच्या लालचीनं आमच्यांतल्या अजागळ लोकांच्या द्वारें, आमचे उन्नत स्वभावगुण नाहींसे करून आह्माला आपल्या पंक्तीस ओढावं. पण यांपैकीं आपल्या तरवारीच्या जोरास आमच्याहि प्रखर तरवारींचा तसाच जोर सामन्याला येत गेल्यामुळं, तो पहिला उपाय केव्हांच व्यर्थ झाला आणि आतां तर या मेवाडच्या महाराण्यानं नुसतं शौर्यच नव्हे, तर आपलेपणाची हानि न होऊं देण्यासारखं विलक्षण धैर्यही प्रत्ययास आणून दिलं त्या योगानं आपल्या दुसऱ्याही उपायाचा निकाल लौकरच लागेल याविषयीं संशय राहिला नाहीं.

**गाझी०**—फिर क्या, अब तो हिंदु बने शिवाय इस

मुलुकमें हमारा बिलकुल गुजारा न होगा, येही तुमारा मतलब है ?

पृथ्वी०—खरं ऐक्य ह्मणाल, तर तें हेंच होय. बाकी हें आपल्याला एकदम कबूल व्हायचं नाहीं हें उघड आहे. तथापि एकमेकांस अत्यंत निरुपद्रवी व उभयतांसही आपापल्यापरी कल्याणकारकच अशी तुमची आमची दोस्ती राहायला आणखीही एक याहून सुलभ उपाय नाहीं असं नाहीं.

गाझी०—वो क्या ?

पृथ्वी०—तुह्मी केव्हांही आमच्या धर्माच्या आणि स्वतंत्रतेच्या बिलकुल वाटेस न जाण्याचा निश्चय करा ह्मणजे झालं. इतरांना विनाकारण उपद्रव देण्याचं आह्मा हिंदूंचं शील नाहींच; आणि एवढंच नव्हे, तर आह्मी स्वभावतां इतके प्रेमळही आहोंत कीं, तुह्मी आमच्याशीं असे सलोख्यानं रहाल तर तुह्माला अर्ध्या वाटेंत पुढं होऊन मिळायला देखील आह्मीच येऊं.

गाझी०—वाहवा ! तुमने आपनी और आपने धरमकी बहोत बढाई करके हमकु ओर हमारे महजबकु तो बिलकुल कमीनाही बना दिया.

पृथ्वी०—तें कांहीं उगीच अभिमानानं नव्हे. आतां आपण इथं आलां आहांत, तेव्हां या इबादतखान्यांत नेहमीं धर्मवाद ऐकायला येत चला, ह्मणजे कोणत्या धर्मात

बिशेष उदार विचार आहेत, हें बादशहाप्रमाणं आपल्याही प्रत्ययाला हळु हळु येत जाईल.

**गाझी०**—अच्छा. चलो. हुजूरकु मिलकर पेहेले ये खत तो देना चाहिये.

( जातात. )

---

( **प्रवेश** २ रा.—**स्थळ**, इबादतखाना.—**पात्रें**, काजी व मुल्ला. )

**काजी**—अस्सलाम आलेकम्.

**मुल्ला**—वा आलेकम् अस्सलाम.

**काजी**—क्यंव मुल्ला साहेब, देखो आज कल क्या तमाशा हो रहा है. आपने दीने महमदीका तो सब जोषही जाता रहा.

**मुल्ला**—ये पूछोही मत. बिरबल, तोडरमल, देवचंद, पृथ्वीराज और उनके धरमपंडितोंने बादशहाकु बीचमें चाऱ्हों तरफसे घेर रखा है. मुझकु ऐसा मालुम होता है के थोडे दीनतक बादशहाकु इस्लामी महजबकी यादबी रहेगी या नहीं.

**काजी**—अकेले हिंदुओंको तो क्युं गुन्हागार बनाना ? आपनेही दीनके वो फजल, शेख अबदुलनबी, जलालुद्दीन काजी, मुबारक और दुसरे कईएक आदमीओंको देखो, के इनोनें क्या कम अंधेर मचाया हुवा है. कोई तो ऐसा केहेता है के गाए कुरबानी करना कुरानशरीफमें लिखा-

ही नही, और कोई ऐसा केहेता के मक्कामदीनाके हाजकु जानेकी कुच जरूर नही. इसी तऱ्हे जैसा जिसका दिलमें आता है वैसा दे ठोकता है !

मुल्ला—बादशहाका ऐसा दिल बरगशता हो जानेसे हिंदु तो क्या, जिस किसी धरमकी आदमीकी मर्जी होतीहै वो हमारे सामने बेठकर हमारे महजबकी बुराई करताहै.

काजी—इस वख्त ऐसा ख्याल करना चाहिये के हमारे दिन बुरे हैं. हजरत पैगंबरके वख्तसे लेकर अबी-तक ऐसे खराब दिन कबी न आयेथे. दीनबदीन आपना महजब तरकीपर था.

मुल्ला—ये देखो, सबधरमोंके आलम लोग आने लगे.

( नास्तिक पंडित येतो. )

काजी ( नास्तिकास )—क्युं नाखुदापरस्तो, अबी-तक तुमकु खुदा मिला के नही ?

नास्ति०—अहो नाहींच जी वस्तु ती मिळणार कशी? मग तिचा शोध करण्याचा यत्न कोण करतो ? आह्माला ती आशाच नाहीं.

काजी—जब तुमकु खुदा मिलनेकी उमेद नथी, तो हमारे दुसरे धरमवालोंके साथ बेएसमे तुम खामखा तंग करनेकुं क्युं आते हो ?

नास्ति—अहो त्याचं कारण इतकंच कीं, वास्तविक

धर्मतत्व कोणालाच समजलं नसतां, आपापल्या परिमित ज्ञानानं ठरविलेल्या कल्पनाच पूर्ण व सत्य मानून त्यांच्या अभिमानानं तुह्मी धर्मवादी जगांत केवढा प्रळय माजवीत आहां, हें तुमच्या ध्यानांत आणून द्यावं. यापेक्षां आह्माला या वादांत पडून दुसरं कांहीं साधायचं नाहीं.

मुल्ला—तुम हमारे साथ झगडा करतेहो के खुदा हैही नहीं; एसा करनेसे तुम दुनिया पैदा करनेवाले खुदाका बडा गुन्हा करते हो.

नास्तिक—तुमच्या ह्मणण्या प्रमाणं ईश्वर ह्मणून खरोखर कोणी असलाच, तर त्याचा अपराध आह्मी अशा प्रकारचा नास्तिकवाद खेळून करीत असतों असं ह्मणण्या पेक्षां, तुह्मी धर्मवादी जे त्याच्या नांवावर भलभलतेच आचार आणि अनर्थ या जगावर करीत असतां, त्या योगानं त्याचा तुह्मा आस्तिक ह्मणविणारांवरच खरा राग होण्याचा संभव आहे. अहो, जें आमच्या प्रत्ययाला येत नाहीं तेंच आह्मी नाहीं ह्मणतों; पण तुह्मी आपापल्या धर्मस्थापकांचे किंवा धर्मग्रंथांचे सांगण्याशिकवण्यावर फाजील भरंवसा ठेवून, जणूं काय सत्यधर्मरहस्य आपल्यालाच काय तें या जगांत मिळालं आहे, अशी आणखी वर घमेंड बाळगतां व धर्माच्या मिषानं अधर्म आणि इतरांचा छळ किंवा तिरस्कार करीत असतां, त्या योगानं तुह्मीच

त्या परमेश्वराचा मोठा अपराध करतां असं ह्मणावं लागतं !

काजी—( कुंठित होऊन ) समजा समजा. अब ये रहना दो. ओ देखो बादशहासलामतकी सवारी आ रही है.

( बादशहा, हिंदुपंडित, अबुलफाजल, पादीसाहेब वगैरे येतात. भालदार चोपदार पुकारतात. )

चोप०—बादशाहोंके बादशहा, शाहीनशाहोंके शाहिनशां, अदलके फैलानेवाले जुलूमकू मिटानेवाले, आलमोंके दोस्त जालमोंके दुष्मन् , इलममें यकता रहेमके पुतले, सुलतान फत्ते जलालुद्दीन महमद अकबर बादशहा गाझीकी आमद आमद है !

भाल०—

( गजल ) "मोओदब होसरके झुकायें शिताब। के नझदीक आते हे आलीजनाब॥ बजालाएं आदाब सब शाहको। करें शाद उस शाह जमजाहको॥ सखावत शुजाअत में वो येक है। हिमायत लियाकतमें वो येक है॥ तरकीप उनका सितारा रहे। सदा ऐश एसा हमारा रहे॥ रहे उसका उनकी सरसब्ज बाग। कयांमतलक गुल न होवे चिराग॥"

बादशहा—( तख्तावर बसून )—

( गजल ) करूं शुक्र किस मूंसे तेरा खुदा॥ कि रुतबा है आली तूं मुझको दिया॥ तेरे आस्तांपर मैं रखता हुं सर॥ कि बक्षिशसे तेरी तू पुर नूर कर॥ करूं सच्चे मजहबकी तालाश मैं॥ न होनेडु खलकतकु गुमराह मैं॥

( सर्व धर्माचार्यांस उद्देशून ) काजीसाहेब, मुल्लाजी,

और सब पंडितों बैठो. पाद्रीसाहेब आपभी बैठीये, और नाखुदापरस्त आपभी आव. तुमने जो सवाल कियाथा उसके मुताबक हमने कुच लडके पैदा होतेही दूर एक मकानमें रख दिये थे. और ऐसा इंतजाम कियाथा, के कोई आदमी उनसे बात तो क्या न करे, बल्के उनके कानपे बातका आवाजभी न जाना पाय. और आज तीन बरसके तज्रबाके बाद इसका नतीजा ये निकला के वो सब लडके गुंगे !

**काजी**–फिर, अब इसपर नाखुदापरस्तोंका क्या बोलना है ?

**नास्ति०**–आमचं ह्मणणं इतकंच कीं, मनुष्याला धर्म-कल्पना उपजतच आहे, ती त्याला कोणी शिकवावी लागत नाहीं, असं जें या आस्तिकवाद्यांचं ह्मणणं असतं, तें या प्रत्यक्ष प्रयोगानं आतां अगदीं खोटं ठरलं. जसं बोलणं चालणं तसाच बरा वाईट विचार करणंही, मनुष्य या जगांत एकमेकांचं पाहून ऐकूनच शिकत असतो. हें त्याचं पाहणं ऐकणं जर बंद झालं, तर या मुलांप्रमाणंच त्याची स्थिति होईल.

**बादश०**–अब दूसरे पंडितोंकी इसपर क्या राय है ?

**मुल्ला०**–(रागानें)ऐसे पखंडी वाह्याद बकबक करनेवालेसे बोलना तो क्या ?

**पाद्री**–" The fool hath said in his heart,

there is no God." ऑमूच्या पविट्र शाष्ट्रांत शांगिटलं आयू कीं, मूर्ख मणुश्श पर्मेश्वर् नाहीं अशं ह्मणूटो. ऑणूखी, "The wicked through the pride of his countenance will not seek after God" दुश्ट् मणुश्य गर्वानं ईश्वराचा शोध करीट नॉयू.

**बादश०**—ये जबाब कुच बराबर नहीं.

**हिंदु पंडित**—आह्मी यावर खुद्द नास्तिकवाद्यांसच उलट एक प्रश्न विचारतों, त्याचं त्यांनीं समर्पक उत्तर द्यावं. अहो—

(१ पद) नैसर्गिक जरि धर्मबीज तें मानवांमधें किमपि नसे ॥ तरि त्याचा अंकुर सर्वत्रचि, भिन्न असो परि, केंवि दिसे ॥ एकाचें पाहून अन्य करि असेंच सगळें जरी असे ॥ मूळ तया एकांत तरी तें उद्भवलें हो बीज कसें ॥ नै० ॥

**बादश०**—अलबत्ता, ये बात कुच माकूल है. (नास्तिकास) क्युं नाखुदापरस्त, इसपर आप क्या जबाब दोगे?

**नास्ति०**—यावर आह्मी विचार करून दुसऱ्या एखाद्या प्रसंगीं या प्रश्नाचं आपणास उत्तर देऊं.

**बादश०**—अच्छा, तो फिर इस बातका फैसला आज रहने दो. अब गये वखत ये बेएस हुईथी के हमारे कुराण सच्चा या पाद्री साहेबकी अंजील? मगर ये खतम नही हुवाथा. अब ये देखिये के क्या नतीजा निकलता है. क्युं पाद्रीसाहेब आपका क्या बोलना है?

पाद्री०—“Neither there is salvation in any other; for there is none other name, under heaven, given among men, whereby we must be saved.” परंटु अशीं किटी वॅाक्यें डाखवून कांहीं ऑमूचंच शाश्ट्र खरं ईश्वरानें डिलेलं टूमी कबूल करणार् नाय्. टुमूची खाटरी करण्याचा एकच मार्ग डिशटो, आणि टो अशा कीं, आह्मी आमूचें बायबल व टुमच्या काजींनीं आपलं कुराण घेऊन डोघांनीं विश्टवांटून चालावें. ज्याचें शाश्ट्र ईश्वरानं डिलेलं खरं अशेल ट्याला विश्टवाकडून इजा होणार नॉय्.

काजी—( चवताळून ) वः, वः, खूप अकलमंदीकी हिकमत निकाली ! ऐसी लटपटसेही आपना धरम तुम फेलाओगे ?

बादश०—हां, काजी साहेब, ऐसी हाथापायीपर मत आवो. पाद्रीसाहेब, इस वख्त आपका बोलनाभी वाजब नही था. तुमारे मुलकमे इलम और हिकमत बहोत बढती है; अगर किसी तरकीबसे तुम आगमेसे निकल जाओ, तो इसे कुच धरमकी सच्चाइ साबत नहीं होती है. ऐसे खुदगरजीके जबाब देकर आपने आपकुई बडा बनाना, और दुसरे धरमोंको झूटा मानना, अगर सख्ती और जुलूम करना, ये मुझकु बिलकुल पसंद नही. ऐसे बातोंका अब मुझको बहोतही पिछताओ हो रहा है. मेरी तो नशिहद ये हुई है—

(गझल) "आपसमे अबस[1] जिक्र[2] है ये दीन महजबका॥ तुम होगे ना ये महजबे तकरार रहेगा[3] ॥ समजेना बुरा दीन महजब येकका दीगर[4] ॥ हरजाई[5] है मावूद[6] ये इसरार[7] रहेगा ॥ तुम सबके सब दीन अपना संभालो मेरे प्यारों ॥ दुनियामें येही मक्कका[8] बाजार रहेगा ॥ इस गुलशने[9] हस्तीमें[10] रखो अपनेको अहेकर[11] ॥ अए बुलबुलों[12] यहां गुल[13] ना ये गुलजार[14] रहेगा" ॥

—इस इबादतखानेके बेएससे अब मुझकु ऐसा मालुम होता है के—

(गझल) हरएक महजबमें है नेकी बतलानेवाले ॥ सच्चा रस्ताभी है दिखलानेवाले ॥ जो करते है अच्छे काम ॥ है दुनियामें वो नेकनाम ॥ नेक जाएंगे बहिश्तमे यार ॥ बदबदीसे होगें ख्वार ॥ कोई अपने धरमको छोडे मत ॥ सच्चाईसे मूं मोडे मत ॥ हरदम रहो खुदाकी सन्नामे तुम ॥ नेकी साथ ले जावोगे तुम ॥

हिंदु पंडि०—खरं आहे खाविंद; आणि एवढ्या करितांच तर आमच्या आर्यवैदिक धर्मांत इतर धर्मांविषयीं औदासिन्यच नव्हे तर अत्यंत औदार्यही दाखविलं आहे. आमचं धर्मशास्त्र नेहमीं सांगत असतं कीं—

---

१ उगीच २ तंटा ३ तुह्मीच या जगांत राहणार नाहींत. हें भांडण मात्र राहील. ४ दुसरा ५ सर्वत्र ६ ईश्वर ७ भरलेला ८ ढोंग धतुरा. ९ —ग. १० जग. ११ नम्रपणानें. १२ हे मनुष्य रूपी पक्ष्या. १३ ताटवे.

( २ पद ) प्रत्येकानें श्रद्धापूर्ण स्वधर्म पाळावा ॥ विधर्मि ह्मणुनी कुणाचाहि छळ कोणी न करावा ॥ धर्मभिन्नतेस्तव इतरांना जे धिःकारीती ॥ वृथा तयांच्या धर्म मतांची अति निंदा करीती ॥ धर्माच्या संस्थाहि तयांच्या तशा विटंबीती ॥ जगत्पालका हा त्यांचा क्रम कसा मान्य व्हावा ॥ प्रत्ये० ॥

—असले उदार विचार इतरही धर्मांत नसतील असं नाहीं. आणि खरंच आहे, तसे ते कां नसावेत ? कारण—

( ३ पद ) ईश्वर केवळ भावभुकेला ॥ समान असती सर्व तया ॥ मशीदींत तो जसा प्रकटतो देवळांतही तसा वसे ॥ निमाज तैशी संध्या ऐके हिंदुयवनही प्रियच जया ॥ अल्ला अल्ला ह्मणुनी तुह्मी आळवितां तो पावतो ॥ रामनाम घेतां अमुचीही तशीच येई त्यास दया ॥ ई० ॥

—पण मनुष्यें आपल्या क्षुद्र व स्वार्थी बुद्धीप्रमाणं ईश्वरांतही भिन्नभाव कल्पून आपसांत कलह व द्वेष माजवितात. अहो, एखाद्या कुशल चित्रकारानं आपल्या तव्यतीप्रमाणं वेगवेगळ्या प्रकारचीं अनेक चित्रं तयार करावींत, त्याप्रमाणं यहच्छेनं भिन्न स्थळीं भिन्न वर्णाश्रमाचीं उत्पन्न झालेलीं माणसं, कोणी छळलीं किंवा त्यांचा नाश करण्याचं मनांत आणलं, तर त्या जगन्नियंत्या प्रभूला हें मान्य होईल काय? कधीं होणार नाहीं. याकरितां हुजूरच्या मनांत अलीकडे धर्मौदार्याचे असे उन्नत विचार बिंबू लागले आहेत हेच खरोखर इहपरलोकीं सर्वांस कल्याणकारक आहेत.

( पृथ्वीराज आणि गाझीखान येतात. पृथ्वीराज डोक्याची पगडी काढून बादशहास सलाम करतो. )

मु०—( एकीकडेस काजीस ) ये देखो, ये बेवकुब अदमीने बादशहाकी कैसी बेअदबी किई. अगर कोई दूसरा बादशा होता तो अबी इसकु कतल करनेका हुकूम देता. लेकर हमारे ये बादशाहा सलामत तो इस बातकोभी ऐसे गमां देंगे या और तऱ्हा देंगे.

बाद०—क्यों पृथ्वीराज, पगडी निकालकर ये सलाम करनेका कोनसा तरीका?

पृथ्वी०—हुजूर, आज ही माझ्या डोक्यावर असलेली पगडी नुकतीच मेवाडच्या राण्यानं मला मोठ्या प्रेमाची भेट ह्मणून पाठविली आहे. ही खुद्द त्याच्या डोकीची आहे व अशी भेट पाठवून त्यानं मला आपला 'पगडीबदलभाई' ह्मटलं आहे. आमच्या पुष्कळ रजपुतांनीं आपलं स्वातंत्र्य, शौर्य आणि कुलशुद्धि हीं बादशाही सत्तेस अर्पण करून हुजूरच्या तख्ताचे ते गुलाम होत चालले आहेत; परंतु आह्मा आर्यांच्या अशा अवनतीच्या प्रचंड ओघाला ज्यानं मोठ्या धैर्यानं व शौर्यानं आडवून हळु हळु तो ओघ परतही फिरविण्याला जो समर्थ झाला आहे, त्या मेवाडच्या महाराण्यानं मात्र आपल्या कीर्तीस व वैभवास हानिकारक अशी या तख्ताशीं कोणत्याही प्रकारची नम्रता आज पर्यंत पत्करली नाहीं. तेव्हां अशा त्या पुरुषपुंगव वीराच्या पगडीला तरी

हा नम्रतेचा डाग माझ्या संसर्गानं कां लागूंद्यावा ? हें मनांत येऊन मी ती एकीकडे ठेवून आपल्याला सलाम केला. आपण त्या बद्दल क्षमा करावी.

**बादश०**—लेकन तुमारे वो राणाका ऐसा कुर्रा अबी तक कायमही रहा होगा क्या ? मालुम होता है के हमारे लष्करने उसके मुल्कमे खुप धूम मचाया है.

**पृथ्वी०**— हे गाझीखान खुद्द शहाजादे यांचं पत्र घेऊन तिकडून आले आहेत, तेंच पहावं ह्मणजे तिकडील हकीकत थोडक्यांत सर्व लक्षांत येईल.

**बादश०**—( गाजीखानास ) पढो पढो भला क्या है ?

**गाझी०**—सुनिये खावंद. ( पत्र वाचतो. )—

" किब्ला आलम जहां पन्हांके खिद्मतमें आरज है "
" के, पहेले राणाका कुच पत्ता न लगता था, और हमकु "
" युं मालुम पडताथा, के अब मेवाडमें उसका रहेना "
" मुशकल है. मगर न मालुम यकायक वो कहांसे नमुदार "
" हुवा, और हरएक जगा हमारे लष्करपर छापे मारकर "
" जहां का तहांही सबकु काट डाला. अगर इतनेमें "
" बरशात न शुरु होजाती, तो उनका अजमीर परभी "
" हुमला करनेका इरादा था. ये मजकूर खिद्मद्तमें "
" रवाना किया है. आयंदा जैसा हुकूम हो वैसा "
" किया जावेगा. "

**काजी व मुल्ला** ( आपल्याशीं )—तोबा तोबा, ये क्या गहजब ! ये क्या हुवा ! अजतागफरउल्ला ! !

**अबुलफाजल**—वाहवा, शाबाश प्रतापसिंग शाबाश! तूं एकही रजपूत है. तुने आपना इरादा नही छोडा और नही बादशहाके आगे शिर झुकाया. ये तेरी बहादुरी सब दुनियामें रोशन होकर बडी नेक नामी होगी.

(गझल) जमानेका[1] देखा अजब रंग है ॥ जहां देखतां हूं नया ढंग है ॥ कोई नामके वास्ते मरमिटा[2]। कोई दामके वास्ते मरमिटा ॥ मगर मर्द मरते रहे नामको ॥ व नामर्द मरते हैं आरामको ॥ दिया तूं न अबतक न किसको खिराज[3]। चलाते रहे शोखसे[4] अपना राज ॥ किया तूं न डोला[5] भि शहाको[6] नजर॥ झुकाया किसीकेभि आगे न सर ॥ कयांमतलक[7] नाम रहे जायगा ॥ सुनेगा वो तहेसीन[8] कर जायगा ॥ ”

**बादश॰**—अच्छा, फिर ऐसा है तो आज दीनसे मेवाडके राणाके साथ किसी किसमकी दुष्मनी न रखकर, उसके साथ हमाभि दोस्तीसे बर्ताव करें गे. ये हमारा इरादा हमारे कुललष्करको और सब सरदारोंको जाहीर करदो, और राणाकुभी ऐसा फरमान भेज दो. गाझीखान खुद तुमही जाना; चलो आजके कामको यहांही खतम करो.

**हिंदुपंडित**—वाहवा, हुजूरच्या या विचारानं ह्यापुढं सर्व हिंदूकडून बादशहास नेहमीं असाच आशिर्वाद मिळेल.—

---

१ दुनियेचा. २ मरताहेत. ३ खंडणी. ४ स्वतंत्रपणानें. ५ मुलगी ६ बादशहाला. ७ जगाच्या अखेरीपर्यंत. ८ आश्चर्य.

(गझल) प्रभो बादशाहास राखीं सुखी तूं ॥ प्र० ॥ यशैश्वर्यसंपन्न करीं दीर्घ आयुरारोग्य दे ॥ समदृष्टी बुद्धि उदार ठेवीं तया तूं ॥ प्र० ॥ १ ॥

भालदा०—रोषननिगार, दरबार बरखास्त !

(पडदा पडतो.)

---

# अंक ७ वा.

(प्रवेश १ ला स्थळ, उदेपूर. पात्रें, रत्नसिंह दिवाणखान्यांत खिन्नमुद्रेनें इकडे तिकडे फिरत आहे.)

रत्नसिं०—(आपल्याशीं)—

(१ पद) विफल मनोरथ होतिल कां ते ॥ व्यर्थ परिश्रम जातिल कां ते ॥ विफ० ॥ ईर्षा काय मनीं मीं धरिली ॥ सामर्थ्याधिक कृति आचरिली ॥ खिन्न फलोन्मुख वेळचि करिते ॥ विफ० ॥

रामप्र०—(प्रवेश करून एकीकडे आपल्याशीं) अगबाई, हें काय बरं?—

(लावणी) कां दीर्घ असे निश्वास सोडिति ग बाई ॥ मुखचंद्र कलाहीनही असा कां होई ॥ कधिं कशाहि अनिष्ट प्रसंगीं ॥ जो म्लान असा झालाच पाहिला नाहीं ॥ मग आजच निस्तेजता कशी त्या येई ॥ कां दी० ॥

रत्नसिं०—(पाहून) कोण, रामप्रसाद ? कारे, एकीकडे कां उभा ?

**रामप्र०**—मुद्रा जरा खिन्न दिसली, तेंव्हां ह्मटलं एकदम पुढं कसं यावं.

**रत्नसिं०**—अरे बुवा, तूं तर अशा आपल्या एकेक गुणानं माझ्या मनाला रोज अधिकाधिकच आपल्याकडे ओढून घेत आहेस—

(२ पद) **वागुनि ऐशा अति विनयानें ॥ त्यापरि एकनिष्ठ सेवेनें ॥ मजवरि ठेवियल्या प्रेमानें मन मोहीशी ॥ किति तरी मला आवडशी ॥ मन० ॥**

**रामप्र०**—(आपल्याशीं) वः, असं झालं असेल तर माझ्या या एकंदर श्रमाचं सार्थकच झालं.—

(गझल) **जाहलें कृतकार्य मी ॥ प्रिय पतीस वाटलें ॥ ॥ जाह० ॥ जिंकुनियां शत्रु जसे ॥ विजय हे पावले ॥ ॥ जाह० ॥**

—(उघड) बरं पण, आज आतां दरबाराला जायची तयारी करायची असून याचवेळीं असं उदास होऊन बसण्याचं कारण काय, तें आहे का मला ऐकण्यासारखं?

**रत्नसिं०**—अरे—

(गझल) **सदा स्वगुणें गड्या माझ्या हृदिस्थानींच तूं वससी॥ न कळवीतां तुला राहे असे मग काय मजपाशीं ॥ असें असतां कशाला तूं मनीं शंका अशी धरिशी ॥ सदा० ॥**

**रामप्र०**—माझ्या समजुतीनं ह्मटलं, ह्मणजे आपल्याला खेद उत्पन्न करणारी ह्या वेळपावेतों फक्त एकच गोष्ट होती. आणि ती रामकुंवर बाईच्या संबंधानं होय. खरंना?

रत्नसिं०—खरं आहे. बरोबर ताडलंस तूं.

रामप्र०—पण त्या कांहीं मोंगलांच्या हातीं सांपडल्या नाहींत, अशी आतां सर्वांची पूर्ण खात्री झाली आहे.

रत्नसिं०—आणि तेंच तर मला जास्त खेद उत्पन्न होण्याला कारण झालं आहे.

रामप्र०—ह्मणजे? शत्रूंनीं त्यांना धरून दिल्लीस नेलं असतं तर बरं, असं वाटण्या इतका का त्यांच्यावर आपला अझून राग आहे तो?

रत्नसिं०—वः, तसा का त्याचा अर्थ तूं समजल्यास? अरे, शत्रूच्या हातीं ती सांपडली हें जर खरं असतं, तर थेट दिल्लीपर्यंतही याच आवेशानं चढाई करून जाऊन तिला सोडवून आणण्याची आशा होती. पण आतां तर तिचा कांहींच पत्ता नसल्यामुळं, मन उदास करणारी अशी तिच्याविषयीं अगदीं निराशा बाळगावी लागत आहे!

रामप्र०—मग, त्यांच्यावर आपलं प्रेमच आहे तर!

रत्नसिंह—कां नसावं?

रामप्र०—ह्मटलं, किं त्यांनीं पूर्वी आपला अपमान केला होता, तेंव्हां—

रत्नसिंग—अरे बाबा, तिनं माझा जरी अपमान केला होता, तरी ज्या अर्थी त्या अपमानामुळंच मजमध्यें विलक्षण ईर्षा उत्पन्न होऊन, महाराणाजींनीं आपल्या बरोबरीनं मला सन्मान द्यावा, असा पराक्रम या लढाईत

मला करण्याची उमेद वाटली, व त्याच प्रमाणं मी तो करूनहि दाखविला, त्याअर्थीं हे सर्व तिचे उपकारच आहेत असं कां मी समजूं नये बरं ?

रामप्र०—मग ह्या वेळीं त्या आपल्याजवळ असत्या तर आपल्या आजच्या आनंदप्रसंगाला विशेषच शोभा आली असती, नाहीं बरं ?

रत्नसिंह—अगदीं खरं आहे. रामप्रसाद, आजच्या प्रसंगीं ती तर मजजवळ असती तर मी काय केलं असतं तें सांग बरं ?

रामप्र०—मी काय सांगूं? तरी पण आपण—

रत्नसिंग—नको. तूं नको सांगूंस. माझ्याच तोंडानं त्याचा उच्चार होऊं दे. आपल्या अपराधाचा अनुतापपूर्वक स्वमुखानं उच्चार केला ह्मणजे त्याचं निम्मं दोषस्वरूप कमी होत असतं; तसंच आपली सदिच्छाही इतरांस आपण नेहमीं ऐकवीत असावी. ह्मणजे कांही अंशांनीं तरी त्या इच्छेला प्रत्यक्ष कृतींचं स्वरूप दिल्याचंहि श्रेय मिळत असतं. ह्मणून ह्मणतों, ऐक, रामकुंवर जर यावेळीं इथं असती तर—

( ३ पद ) सर्व पूर्व अपराध विसरुनी ॥ प्रियच तिला मीं मानिलि असती ॥ सांप्रत या मम ऐश्वर्याची ॥ खरी विभागिनि केली असती ॥ पराक्रमें मिळविला मान हा ॥ देउनि आनंदविली असती ॥ सर्व पूर्व० ॥

—पण आतां ही सर्व आशा व्यर्थ होणार कीं काय, या शंकेनं माझं मन अगदीं उदास झालं आहे!

( आपल्याशीं) आणखी थोडी मनाची परीक्षा
; ) पण मी ह्मणतों, कुंवरबाईना त्यांच्या
श्चात्ताप होऊन त्यांनीं आपल्या जिवाचं कांहीं
केलं नसलं ह्मणजे बरं.

—हाय! तसं होईल तर माझं पुढील आयुष्य
जाणार नाहीं. मी एकदम विरक्त होईन.

–( आपल्याशीं )–अहाहा ! आणखी ती
पाहिजे? मी आपली ओळख देऊं का आतां?
ला इतक्यांतच ओळख देतां कामा नये.
इकडचं हें मी बसवून घेतलेलं प्रेम राणाजींच्या
नगोदर मला आणून दिलं पाहिजे. कारण मी
ीचा पूर्वी अपमान केला होता, त्याबद्दल माझं
नही न करण्याचा राणाजींचा निश्चय आहे.
ं दरबारांत पतीच्याच मुखानं मी त्यांना प्रिय
राणाजींच्या प्रत्ययाला सर्वांसमक्ष आणून देऊन
ी ओळख द्यावी हें बरं.

सं०—असो, रामप्रसाद, आज तूं आतां मजबरो-
रांत आलं पाहिजेस. युद्ध प्रसंगांत ज्यांनीं मोठ-
ामगिऱ्या बजावल्या त्यांचा तेथें मोठा सन्मान
आहे त्यांत तुझाही एक वांटा आहेच.

प्र०—( आपल्याशीं ) त्याचीच तर मी मोठ्या
नं वाट पाहत आहे. ( उघड ) ठीक आहे. आपण

तयार व्हावं. मी येतोंच. ( रत्नसिंह गेल्यावर )—

( गझल ) धीर धरीरे मना तूं धीर धरीरे ॥ न होई उतावीळ मना धीर धरीरे ॥ प्रिय झाल्यें निज पतीस मी॥ प्रत्यय हा आतां॥राणाजींना दाविन तोंवरि धीर धरीरे॥

( जाते. )

---

( प्रवेश २ रा. स्थळ, उदेपूर राजवाड्यांतील दरबार—पात्रें, महाराणा प्रतापसिंह, अमरसिंह, शक्तिसिंह, रत्नसिंह, रामप्रसाद, भामाशा, माधोसिंग, भिल्ल, गाझीखान, दिवाणजी, चित्रभाष, भालदार वगैरे. देखावा—मध्यभागीं छत्रचामरयुक्त सिंहासनावर राणा युवराजा सह बसला असून दुतर्फा आपापल्या आसनांपुढें सर्व उभे आहेत. )

भालदार—श्रीमद्राजराजेश्वर परम प्रतापी महाराणा श्रीप्रतापसिंह महाराज !

( सर्वजण मुजरा करून बसतात. )

चित्रभाष—

( कवित्त ) चंद्र जेंवि तारकांत ॥ इंद्र वृंदारकांत ॥ क्षात्रवीर्यधारकांत ॥ एक प्रतापसिंह हे ॥ सिंह जेंवि मृगकुलास ॥ श्रीहरी असुरबलास ॥ कृतांत तेंवि मोंगलांस॥ एक प्रताप० ॥ सूर्य तिमिरनाशनास ॥ धैर्य भयनिवारणास ॥ आर्यदास्यमोचनास ॥ एक प्रतापसिं० ॥ शौर्यतेज दीप्तिमंत ॥ स्वाभिमान मूर्तिमंत ॥ भूतलांत कीर्तिवंत ॥ एक प्रताप० ॥ सुवासिनीस कुंकुमांक ॥ रजनिला जसा मृगांक ॥ भारतांबभालतिलक ॥ एक प्र० ॥ कालकूट त्रिभुवनास ॥ जेंवि दावानल वनास ॥ ताप-

ग्रचि रिपुमनास ॥ एक प्र० ॥ जैंवि रवी नभोंगणांत ॥ त्यापरी रणांगणांत ॥ परप्रकाशहरणशक्त ॥ एक० ॥ अचल मेरु तैंवि धैर्य ॥ कार्तिकेयतुल्य शौर्य ॥ सूर्यकुलीं आर्यवर्य ॥ एक० ॥

—( मुजरा करून ) महाराणाजींचा जयजयकार असो.

**प्रतापसिंह**—

( भूपाळी ) जयजयकार ध्वनि हा ऐकुनि समाधान होतें ॥ परि अंगीकृत कार्य संपलें ऐसें नच गमतें ॥ अझुनि भूमितें रिपु गर्वानें तुडवीतां दिसतें ॥ तशीच दैना पारतंत्र्याहि न सुटती स्वजनांतें ॥ जसें अनिष्ट प्रसंगींही मज धैर्य अचल होतें ॥ तसें इष्ट या समयिं न विसरो मी कर्तव्यातें जय० ॥

—असो, दिवाणजी, हे माझे साह्यसंकेती सरदार मानकरी आज ह्या ठिकाणीं बसले आहेत. यांणीं नुकत्याच संपलेल्या लढाईत आपल्या कर्तव्यास स्मरून जें शौर्य गाजविलं त्याबद्दल त्यांचा आजच्या या दरबारांत मजकडून कांहीं तरी गौरव व्हावा अशी इच्छा आहे.

**दिवाण०**—फार उत्तम आहे. त्याप्रमाणं मी व्यवस्था करतों.

**भालदार०** ( पुकारतो )—महाराज, हे या शहरचे श्रीमंत सावकार भामाशा मुजरा करीत आहेत. ( भामाशा उठून मुजरा करतात. )

**प्रताप०**—अहो भामाशा, आपण या गादीचा अभिमान ठेवून आपली सर्व संपत्ति ऐन प्रसंगीं आमच्या-

स्वाधीन केलीत, या आपल्या राजनिष्ठेबद्दल आह्मीं आपल्यास आमचे कोशाध्यक्ष केलं आहे.

( दिवाणजी पोषाख देतात. )

**भामाशा**—महाराज, या गादीच्या आश्रयानंच सुरक्षित असणारी माझी संपत्ति, प्रसंगीं या गादीच्या उपयोगी पडली, याबद्दल माझा एवढा गौरव कशाला? तथापि महाराजांचा हा मोठेपणा आहे असं समजून आपल्या या देणगीचा मी नम्रतापूर्वक स्वीकार करतों.

**भालदा०**—हे देलवाड्याचे महाराज माधोसिंग मुजरा करीत आहेत. ( माधोसिंग मुजरा करतात. )

**प्रताप०**—माधोसिंग, आमच्या रजपूत राजवर्गानं केवळ अदूर दृष्टीमुळं घालून ठेवलेला दास्य वृत्तीचा, पण तूर्त सुखाचा दिसणारा, मार्ग सोडून आपण आमच्या कष्टमय मार्गास येऊन मिळाला, या कारितां ह्या पुढें आह्मी आपणास या दरबारांत आमच्या उजवे हाताला बसण्याचा मान देत आहों. आपण त्याचा स्वीकार करावा.

( दिवाणजी पोषाख देतात. )

**माधोसिं०**—या बहुमानाबद्दल मी आपला आभारी आहें. महाराज नुकतंच मला असं एक वर्तमान समजलं आहे, कीं मूर्खपणानं सुखाचा ह्मणून पत्करलेल्या मार्गाचा नीचपणा उत्तरोत्तर बऱ्याच आमच्या रजपूत राजांच्या चांगला प्रत्ययास येऊं लागला असून, आतां आपल्याला

पावन करून पुनः रजपूत बनवावं, अशी ते या शुद्ध व स्वतंत्र गादीस लौकरच विनंती करणार आहेत.

( मुजरा करून बसतो. )

**प्रताप०**—पृथ्वीराज राठोड यांच्या पत्रांत तें एक भाकीत होतंच. तथापि माधोसिंग,—

( साकी ) **सहज जसा अविचार तसा तो पश्चात्तापहि होतो ॥ यास्तव कांहीं दिवस बघावें लागे, किति तो टिकतो ॥ इतक्यांतचि त्याला ॥ पात्र न गणुं विश्वासाला ॥**

**चित्र०**—आणि पुढं तरी कांहीं शर्तीनंच त्यांच्या त्या पश्चात्तापाचा विचार केला पाहिजे.

**भाल०**—कोमळमिराहून राणाजींचीं मुलं माणसं अरवली पर्वताकडे गुप्तपणानं सुरक्षित घेऊन जाण्यास उपयोगी पडलेला हा भिल्ल महाराजांस मुजरा करीत आहे. ( भिल्ल मुजरा करतो. )

**प्रताप०**—अहो, या लोकांनीं तर हरएक संकट प्रसंगीं आमचं अतिशय साह्य करून आह्माला वंशपरंपराच आपलं ऋणबद्ध करून ठेवलं आहे. यांचं उतराई आह्माला कधींच होतां यावयाचं नाहीं. तथापि या भिल्लानं ज्या अरण्यांत आमच्या मंडळीचं रक्षण केलं तिथली पूर्ण मालकी यास देऊन याला पांचशें भिल्लांचा रावत करावा. ( भिल्लास पोषाख देतात. )

**भालदा०**—हे महाराजांचे कनिष्ठ बंधू मुजरा करीत आहेत.

**प्रताप०**—शक्तिसिंह, बंधुत्वाच्या नात्याला अनुसरून प्रसंगीं माझा पाठिराखा झालास याबद्दल तूं मला फारच ऋणी करून ठेवलं आहेस.

**शक्ति०**—पण बंधू, मागचे माझे सर्व अन्याय विसरून पुन: प्रेमानं तूं माझ्याशीं वागूं लागल्यामुळं त्या ऋणाची फेडही झाली आहे.

**प्रताप०**—अरे बाबा ती कधींच व्हायची नाहीं. तथापि तुझ्या या प्रशंसनीय कृत्याचं पुढील संततीला स्मरण रहावं ह्मणून, आजपासून तुझ्या वंशाला "खुरासान मुलतानका आगल" ही पदवी देऊन, तूं मोठ्या शौर्यानं जिंकलेला भाइन्सोर किल्ला व त्याच्या भोंवतालचा प्रदेश यांचं स्वामित्व तुजकडे दिलं आहे.

( दिवाणजी पोषाख देतात. )

**शक्ति०**—बंधू , मजप्रमाणंच अकबराकडे जाऊन मिळालेल्या आपल्या सागरसिंहासही तूं क्षमा करावीस, अशी त्याच्या तर्फे माझी तुला विनंती आहे.

**चित्रभाष**—अहो पण, जें चितोर शत्रूपासून शौर्यानं जिंकून परत घ्यायचं, तें त्यांच्या मेहेरबानीनं मिळवून तिथं ते सागरसिंह सांप्रत तर राजैश्वर्यानं राहिले आहेत असं कळतं ?

**शक्ति०**—होय; परंतु वास्तविक आपल्या हक्काची वस्तु असतां ती अशी भिक्षेनं मिळवल्याची लाज त्यांना वाटत

असून, आतां तीच ते राणाजीला अर्पण करून कृतापराधा-बद्दल ही क्षमा मागत आहेत.

चित्रभाष–व:, मग तर चितोर परत मिळाल्यावर, राणाजींनीं त्याच्या मुक्ततेकरितां आतांपर्यंत बाळगलेल्या या कष्टमय व्रताची सहजच पूर्णता होणार आहे !

प्रताप०–चित्रभाष, अहो, आपली वस्तु आपल्याला घ्यायला कांहीं हरकत नाहीं हें खरं. तथापि ती अशा रीतीनं आमच्या हातीं यावी हें कांहीं आह्मांस मान्य नाहीं. अशानं मी आपलं व्रत पूर्ण झालं असं समजत नाहीं. मी तर माझं हें व्रत आमरण पाळीनच; परंतु पुढंहि अशीच स्थिति राहिल्यास माझ्या वंशजांनींही तें पाळावं अशी माझी आज्ञा आहे. असो, शक्तिसिंह, सागरसिंहावरहि आह्मीं ह्यापुढं पूर्ववत लोभ ठेवीत असून त्याच्या या देणगीचा स्वीकार आह्मीं या दृष्टीनं मात्र केला आहे असं त्यास आपण कळवावं.

भालदार–महाराज, दिल्लीपति अकबर बादशहाकडून हे थैली व पोषाख घेऊन आलेले मोंगल सरदार गाझीखान मुजरा करीत आहेत.

( गाझीखान थैली व नजराणा पुढें ठेवून मुजरा करतो. )

प्रताप०–दिवाणजी, काय ती थैली आहे. पहा बरं.

दिवाण०–( थैलींतून पत्र काढून ) हें पत्र खुद्द बादशहानं आपणास पाठविलं आहे. ( वाचल्यासारखं करून ) यांत ह्यापुढं सर्व प्रकारें आपल्यांशीं दोस्तीच राखण्याची

( दिवाणजीस ) दिवाणजी, यांच्या वडिलांनीं रणप्रसंगीं जें आमचं छत्र आपल्या मस्तकावर घेतलं होतं, तेंच आतां यांच्या राजसिंहासनावर अक्षय्य असों द्यावं, आणि 'राजे' या नांवानं यांची द्वाही फिरवून हे दरबारास येत जातील त्या वेळीं महाद्वारांपाशीं नौबत वाजवून यांचा सत्कार करीत जावा.

**दिवाण०**—आज्ञेप्रमाणं सर्व होईल. ( रत्नसिंहास पोषाख देतात. )

**प्रताप०**—राजे रत्नसिंह आपणही आपल्या वडिलांबरोबर ईर्षा धरून आलांत, त्याप्रमाणं ह्या लढाईत आपण आमचं साह्य उत्कृष्ट केलं आहे. तेव्हां त्याबद्दलही आह्मी आपलं कांहीं प्रिय केलंच पाहिजे. पण तें काय करावं हें सांगायचं आह्मी आपल्यावरच सोंपवितों. कारण आह्मांला या प्रसंगीं जें कांहीं करतां येण्यासारखं होतं तें दुर्दैवानं आह्माला तूर्त अंतरविलं आहे!

**चित्रभाष**—(एकीकडे)खरोखर, यावेळीं रामकुंवरबाई असत्या ह्मणजे किती उत्तम झालं असतं.

**रत्नसिं०**—राणाजी, आपण आपल्या बरोबरीचा सर्व मान आह्मांला देऊन आमचं सर्वथा प्रिय केलंच आहे. तथापि आपली इच्छा आहे त्याअर्थीं हा माझा एक अत्यंत प्रिय सेवक ह्या ठिकाणीं उभा आहे, याचं आपण, तो ह्मणेल तें, प्रिय करावं ह्मणजे झालं. हा जरी सेवक याच नात्यानं मजजवळ राहिला आहे, तरी यानं

बादशहानं इच्छा दर्शविली असून त्या इच्छेस आपण मान द्यावा अशी विनंती केली आहे.

प्रताप०—अहो, पण त्यांच्या इच्छेप्रमाणं आह्मीं त्यांच्याशीं सख्यत्वानं वागायला, अशी कांहीं त्यांनीं आमची विनंती करायला नको होती. याचा उपाय त्यांच्याच हातीं आहे. दिवाणजी, या सरदारांस पोषाख देऊन दिल्लीपतीस असं उत्तर पाठवा—

(भैरवी दादरा.) आतिथ्यें केवळ हें वैर नच शमे ॥ तच्छामक मार्ग कथूं जो अह्मा गमे ॥ आतिथ्यें० ॥ देश-धर्मकुल असतीं ॥ क्षात्रां प्रिय पूज्य अति ॥ तच्छळकां प्राणान्तीं ॥ तो न कधिं नमे ॥ आति० ॥ ह्मणुनि या तिहींस कधीं ॥ लावुं नका दुरुपाधी ॥ अन्योन्य स्नेहबु-द्धि ॥ सहज मग जमे ॥ आति० ॥

(गाझीखानास पोषाख देतात, तो मुजरा करून बसतो.)

भाल०—महाराज, साद्री संस्थानचे अधिपति, आपले जामात, झाला रत्नसिंहजी मुजरा करीत आहेत.

प्रताप०—रत्नसिंह, आपल्या वडिलांनीं आमच्या प्रीत्यर्थ आपले प्राण खर्ची घालून आमच्यावरील आपल्या निष्ठेचं जें लोकोत्तर प्रदर्शन केलं त्याबद्दल आह्मीं आतां आपला कितीही सन्मान केला, तरी तो थोडाच होणार आहे. तथापि त्या उपकाराचं अंशतःही उतराई ह्मणून नव्हेच, तर आह्मी आपले ऋणी आहोंत याची पुढें सदां आठवण राहावी ह्मणून, जो हा यत्किंचित्त आह्मी आपला सत्कार करतों त्याचा आपण स्वीकार करावा.

दिवाणजीस ) दिवाणजी, यांच्या वडिलांनीं रणप्रसंगीं आमचं छत्र आपल्या मस्तकावर घेतलं होतं, तेंच ाता यांच्या राजसिंहासनावर अक्षय्य असों द्यावं, ाणि 'राजे' या नांवानं यांची द्वाही फिरवून हे दर-ारास येत जातील त्या वेळीं महाद्वारांपाशीं नौबत वाज न यांचा सत्कार करीत जावा.

**दिवाण०**—आज्ञेप्रमाणं सर्व होईल. ( रत्नसिंहास ोषाख देतात. )

**प्रताप०**—राजे रत्नसिंह आपणही आपल्या वडिलां ारोबर ईर्षा धरून आलांत, त्याप्रमाणं ह्या लढाईंत ापण आमचं साह्य उत्कृष्ट केलं आहे. तेव्हां त्याबद्दलही ाह्मी आपलं कांहीं प्रिय केलंच पाहिजे. पण तें काय करावं हें सांगायचं आह्मी आपल्यावरच सोंपवितों. ारण आह्मांला या प्रसंगीं जें कांहीं करतां येण्यासारखं ोतं तें दुर्दैवानं आह्माला तूर्त अंतरविलं आहे !

**चित्रभाष**—(एकीकडे)खरोखर, यावेळीं रामकुंवरबाई असत्या ह्मणजे किती उत्तम झालं असतं.

**रत्नसिं०**—राणाजी, आपण आपल्या बरोबरीचा ार्व मान आह्माला देऊन आमचं सर्वथा प्रिय केलंच ाहे. तथापि आपली इच्छा आहे त्याअर्थीं हा माझा ्क अत्यंत प्रिय सेवक ह्या ठिकाणीं उभा आहे, याचं ापण, तो ह्मणेल तें, प्रिय करावं ह्मणजे झालं. हा जरी ेवक याच नात्यानं मजजवळ राहिला आहे, तरी यानं

आपल्या नम्रपणानं, सद्गुणानं, एकनिष्ठ सेवेनं, फार काय पण, कोमळमीरचा किल्ला मीं घेतला त्यावेळीं विशेष पराक्रमानंही मला अगदीं आपलंसं करून टाकलं आहे.

प्रताप०—असं काय ? ठीक आहे. कायरे बोवा, तुझं नांव गांव काय आणि यांच्या इच्छेप्रमाणं आह्मी तुझं कोणतं प्रिय करावं तें सांग बरं ?

राम०—( पुढें येऊन कपडे काढीत) ऐकावं महाराज,—

( दिंडी ) जिनें करतां अपमान निज पतीचा ॥ राग-अग्निचेवर जाहला पित्याचा ॥ स्वपति जवळच जी पुढें गुप्तराही ॥ पुरुषवेषें ती रामकुंवर मी ही ॥

प्रताप०—कोण आमची रामकुंवर ! अहाहा ! काय आनंदाचा प्रसंग हा ! अरे ( भालदारास ) अगोदर राणी-वशांत जाऊन हें वर्तमान तिकडे कळीव बरं !

रामकुंवर—राणाजी—

( ६ पद ) पतिला प्रिय मी पुनरपि झाल्यें ॥ ह्मणुनिच तुह्मा सन्मुख आल्यें ॥ अपराधाची क्षमा मज व्हावी ॥ जवळ पुन्हा ही प्रेमें घ्यावी ॥

( पाया पडते. प्रतापसिंह तिला उठवून जवळ घेतो. )

प्रतापसिंह—( रत्नसिंहास )—राजे रत्नसिंह आपण होऊनच हिला प्रिय मानलं आहे, तेव्हां हिचे मागील अन्याय हिला क्षमा करून हिच्यावर प्रेम ठेवा, असं सांगण्याचं आतां कारणच राहिलं नाहीं.

रत्नसिंह—( एकीकडे ) आणि मला तरी आतां यावर काय उत्तर देण्यासारखं राहिलं आहे—

७ पद ) चोरिलें मन हिनें अधिंच तें ॥ चोरिलें० ॥
ा बद्ध मत्प्रेम सद्गुणें ॥ केलें अपुलें हिनें कधिंच
चोरिलें मन० ॥ शिरुनि हृदयमंदिरीं हळुच मम ॥
ें सारें हिनें कधिंच तें ॥ चो० ॥

( राणी, तिच्या व रामकुंवरच्या सख्या येतात. )

ाणी—ये ये बेटा रामकुंवर, मला एकदां कडकडून
शी ! ( आनंदानं भेटतात. )

मकुं०—आई, तुला मी नमस्कार करत्यें.

णी—बेटा, जन्मभर आपल्या पतीला अशीच प्रिय
राहा.

ाप०—अहाहा ! ह्या आनंदाचे प्रसंगीं चला सर्व-
ासेच श्री एकलिंगजीच्या दर्शनाला जाऊं!

सर्व स्त्रिया पुढील पद्यानें महाराण्याचा गौरव करतात. )

ार्भा ) श्रीमन्महींद्र यावदार्यकुलतिलक महा-
॥ असे जो मूर्त महामान ॥ प्रगट क्षात्रतेज पूर्ण ॥
गी तो प्रतापशाली प्रतापाख्य जाणा ॥ असो तो
ापात्र ॥ होउं तो विजयी सर्वत्र ॥ भस्म करो
ौर्यतेज त्या तुर्क राक्षसांना ॥ तयाचें चरित जनीं
॥ सकलां बोधप्रद वाटो ॥ निवटो दास्य दुःख
श्रीमन्महीं० ॥

( पडदा पडतो. )

---

## नाटकाचें तात्पर्य.

( "कोइरबकी मर्जी क्या जाने०" ही चाल. भैरवी

नाटकरूपें जो हा दिसला ॥
इतिहासाचा भाग तुह्माला ॥
प्रसंग आज नसे जरि असला ॥
विसरूं नका परि तात्पर्याला ॥ न
इतिहासाची पुनरावृत्ति ॥
होते ऐसें पंडित ह्मणती ॥
ह्मणुनि अशी केव्हां जरि पुढतीं
येइ दशा या देशावरतीं ॥
केव्हां साधन उत्कर्षाला ॥
खरें काय तें समजायाला ॥
प्रसंग आज० ॥ विसरूं० ॥ नाट०
अचल वसो स्वातंत्र्यप्रीति ॥
राजनिष्ठ अभिमानहि चित्तीं ॥
दक्षपणा तो नढळो स्वार्थी ॥
दृढ परोपद्रवी नसो मति ॥
धरूनियां नीत्यैकपथाला ॥
प्रिय व्हावें श्री भगवंताला ॥ ना